TO

# RÁMCHANDRARAÓ APAŚÁHEB ESQ.,

## THE CHIEF OF JAMKHINDEE,

DISTINGUISHED FOR HIS ENLIGHTENED VIEWS
AND GREAT ZEAL IN THE SOCIAL REFORM
OF HIS COUNTRY,

BY HIS PERMISSION,

## This Work is dedicated,

BY

THE AUTHOR.

श्रीमंत राजमान्य राजश्री

**रामचंद्रराव ऊर्फ आपासाहेब पटवर्धन,**

जमखिंडीकर संस्थानी

यांचे उत्तम विचार व स्वदेशसुधारणेच्छा

मनांत आणून,

ग्रंथकर्त्यानें,

त्यांच्या परमाणगीवरून,

**हा ग्रंथ**

त्यांस परमादरानें नजर केला आहे.

# PREFACE.

---

Although the theme of this work is old, the method of discussing it is new, that is, this is the first time that it has been handled in this manner. The style of the work at first sight may be thought unnecessarily tautologous; but on considering the classical technicallity of the method of discussion necessitated by the nature of the subject, and the present low scale of intelligence among the people, and their inability to follow a train of connected arguments, the translator as well as the original author have thought it incumbent on them to make the subject as plain as they possibly could.

The translator is conscious that he has not deviated from the spirit of the original work, which in itself is quite complete. In one place, however, the illustrations in the original being unintelligeble in this part of India, the translator has added some more familiar ones.

The author, while preparing his work from Bengalee into English, omitted several chapters,

considering them somewhat unimportant to the English reader, and the translator of the present volume has adopted the same plan on the same grounds.

When the same text occurs in more than one place, its version except for special reasons, is given always on the first occasion only, reference being made to that place in foot-notes on every succeeding occasion.

In order to test the genuinness of the numerous texts in the original, the translator has actually taken the trouble of referring some of them to the works of authority from which they have been extracted, and has found to his deep satisfaction that they are correct.

Some more circumstancial arguments, somewhat pertinent to the subject, having been suggested by a worthy friend, room was made for them in the appendix.

V. P. S. P.

Bombay, January 1865.

# INTRODUCTION.

---

People have come to regard it as an esta-lished truth that the re-marriage of high aste Hindu widows has been strictly forbid-en in the Kaliyuga by our venerable and ursighted Rishis of yore. This opinion though pparently true, is an insult to the pure and hilanthropic character of our religion, and as been very successfully proved to be totally nfounded by Babu Eshwar Chandra Vidya-agar, a learned Bengalee Pandit, and the rincipal of the Calcutta Sanscrit College, ho has collected together several texts in is favour from reputable old authors of mritis. The author has done thorough ustice to the subject he has taken up, and has eft not the slightest shadow of a doubt both s to the validity of the arguments adduced, and made to bear upon the subject, and the futility of the reasons against re-marriage.

In performing the above duty, the author lid not trust the correctness of his arguments nerely because they satisfied his own mind,

but he also consulted many learned Bengalee Pandits of the present day, and obtained the sanction of their authority in writing as to the entire correctness of his views.

Poor and helpless Hindu widows have been most unjustly subjected to the unbearable hardships and tortures of single life, often from their very infancy, and deprived of legitimate happiness, by the force of a pernicious notion which originated either in the popular ignorance of our Shastras, or from the absence of a critical power so indispensable in weighing the apparently conflicting texts of different legislators. All this has been very successfully pointed out by the author.

The translator of this work after having perused it in English thought it worth while to render it into Máráthí, and publish it for the benefit of his country. Newspaper-editors, pamphleteers, essayists and other writers whose minds are more or less bent upon the Social Reform of this country, have often ventilated the subject of this little treatise throughout the length and breadth of India. But they have almost without exception looked to it from a different point of view from the spirit of this work. They looked at the absence of widow-marriage among high cast Hindus as one of the greatest social evils. They have honestly depicted

# प्रस्तावना.

---

या ग्रंथांतील विषय ह्मणजे विधवाविवाह हा जरी जुना आहे तरी याचा विचार करण्याची या ग्रंथांतली रीति अगदीं नवी आहे; ह्मणजे या विषयाचा विचार केवळ शास्त्र-रीतीनें आजपर्यंत कोणी तादृश केला नाहीं. आणि या ग्रंथांत तर या विषयाचा विचार अथपासून इतिपर्यंत केवळ शास्त्रप्रक्रियेस अनुसरूनच केला आहे. या ग्रंथाच्या लेखाच्या सरणीस पुनरुक्तीचा अथवा गरज नसतां उगीच विशेष स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न केल्याचा दोष कोणी वाचणारे कदाचित देतील; परंतु या विषयाच्या जातीवरूनच यावर शास्त्रीयरीतीनें विचार करणें आवश्यक पडलें व त्यावरून त्यांतील पारिभाषिक शब्द व रीति ह्या घेणेंही जरूर पडलें. आणि आमच्या प्रस्तुतच्या सर्व साधारण वाचणाऱ्यांस असा विषयच मुळीं समजणें थोडेंसें कठिण आणि त्यांत परस्परांशीं संबद्ध अशा प्रमाणपरगोष्टींच्या दीर्घ श्रेणी-चें एकसारखें अनुसंधान ध्यानांत राहणें हें तर त्याहूनही कठिण आहे. या गोष्टींचा विचार करतां मूलग्रंथकर्ता व भाषांतरकर्ता यांस, पुनरुक्तीकडे किंचित दुर्लक्ष करूनही हा विषय जितका विशद करवला तितका करणें जरूर पडलें.

भाषांतरकर्त्यानें मूलग्रंथाचा अर्थ व अभिप्राय कोठें सो
डले नाहींत. तरी एकेठिकाणीं मूलग्रंथांत दिलेलीं उदाहर
बंगाल प्रदेशांतील असल्यामुळें इकडच्या लोकांस समजण्या
सारखीं नव्हतीं, त्याकारितां या प्रदेशांतील विशेष माहितीच
कांहीं उदाहरणें ज्यास्ती घातलीं आहेत.

मूलग्रंथकर्त्यानें तो बंगालींतून इंग्रेजींत केला तेव्
बंगालींतील कितीएक अध्याय इंग्रेजी वाचणारास अनुप
क्तसे वाटून ते त्यानें समूळ गाळले. भाषांतरकर्त्यास
आपल्या वाचणारांविषयीं तसेंच वाटून त्यानेंही या ग्रंथां
ते गाळले आहेत.

कधीं कधीं एकच स्मृति अनेकवेळां आली आहे तश
ठिकाणीं पहिल्या प्रसंगीं मात्र तिचा अर्थ लिहून दुसऱ्या
काणीं त्या पृष्ठावरील अर्थाचा हवाला टिपेमध्यें दिला आहे

मूलग्रंथांतील वचनें ज्या दुसऱ्या ग्रंथांतून घेत
आहेत तीं तशीं आहेत किंवा कसें हें पाहण्याकरतां, ज
ग्रंथांचे हवाले ग्रंथकर्त्यानें दिले आहेत त्यांतील कितीएक
चा भाषांतर कर्त्यानें स्वतः तपास केला त्यावरून
ग्रंथकर्त्यानें लिहिल्याप्रमाणेंच बरोबर आहेत असें खात्री
समजलें ही गोष्ट मोठी संतोषाची आहे.

याच ग्रंथांतील विषयास कांहीं अंशीं लागून असले
एकदोन गोष्टी एका सुज्ञ मित्रानें मेहरबानीनें सूचविल

त्या या ग्रंथाच्या अखेरीस परिशिष्ट जोडून त्यांत लिहिल्या आहेत.

वि. प. शा. पं.

मुंबई—जानुआरी १८६५.

# अनुक्रमणिका.

## हिंदु विधवाविवाह—प्रत्युत्तर.

# विधवाविवाह,

हा ग्रंथ

ईश्वर चंद्र विद्यासागर

यांनीं

बंगाली व इंग्रजी या भाषांत केला आहे,
त्याचा हा मराठी तर्जुमा

विष्णुपरशुराम शास्त्री पंडित
यांनीं केला,

तो

मुंबईत

इंदुप्रकाश छापखान्यांत छापिला.

सन १८६५.

किंमत १ रुपया.

# हिंदु विधवांचा विवाह.

विधवांचा विवाह न करण्याच्या चालीपासून जे अनेक प्रकारचे अनर्थ घडतात त्यांविषयीं पुष्कळ हिंदु लोकांची पक्की खातरी झाली आहे. कांहीं लोक आपल्या विधवा झालेल्या कन्या, बहिणी वगैरे स्त्रियांस विवाह करून देण्यास आज तयार आहेत; आणि कितीएक इतपत तयार नाहींत; पण ते विधवांचा विवाह व्हावा ही गोष्ट अत्यंत आवश्यक आहे खरी, असें तरी मान्य करतात.

विधवाविवाह हा आमच्या शास्त्रांस संमत आहे किंवा नाहीं या गोष्टीचा विचार, कांहीं दिवसांपूर्वीं बंगालच्या कांहीं मुख्य मुख्य पंडित लोकांनीं केला. परंतु या हिंदुस्थान देशांतील आधुनिक पंडितांचा असा कांहीं चमत्कारिक सांप्रदाय पडून गेला आहे, कीं ते कोणत्या एखाद्या विषयावर वादविवाद करूं लागले असतां स्वपक्ष स्थापन करून जय मिळवण्या विषयीं इतके अभिमानास पेटतात, कीं त्या विषयांतला वास्तविक विचारांश सर्वथैव सोडून देतात; यामुळें पंडितांची सभा भरवून एखाद्या विषयांतील सत्यांशाचा निर्णय करूं असें जर मनांत आणिलें तर तें होण्याची आशा नाहीं. विधवाविवाह शास्त्र संमत आहे किंवा नाहीं याविषयीं बंगालच्या पंडितांनीं विचार केला ह्मणून मागें लिहिलें; त्या विचारांत असें झालें कीं, दोन प-

क्षां पैकीं प्रत्येक पक्षाच्या लोकांनीं आमचा जय झाला विरुद्ध पक्षाचा पराजय झाला असें मानिलें. यावरून त्या विचारांत निर्णय काय झाला असावा हें सहजच समजतें ह्मणजे विचार्यांशाचें कांहींच झालें नाहीं. तथापि यापासून एक कार्य मोठें झालें कीं, त्या वेळेपासून बंगाल्यांतल्या पुष्कळ लोकांस या गोष्टीचा निर्णय काय तो आपणास कळावा या विषयीं अतिशयित उत्कंठा झाली. ही उत्कंठा पाहून या ग्रंथाचा मूळ कर्ता, **ईश्वरचंद्र विद्यासागर** कलकत्यांतील एक पंडित, हा विधवाविवाहा विषयीं साधक बाधक विचार करूं लागला आणि त्या विचारापासून जें हंशील निष्पन्न झालें तें त्यानें बंगाली व इंग्रजी या भाषांत छापून प्रसिद्ध केलें. त्यांपैकीं इंग्रजी भाषेंतल्या ग्रंथाचा हा मराठी तर्जुमा करून लोकांस सादर केला आहे. तर हा आतां निष्पक्षपात अंतःकरणानें साद्यंत वाचून मग विधवाविवाह करण्याचा सांप्रदाय चालू करणें प्रशस्त आहे किंवा नाहीं याचा हिंदु लोकांनीं निर्णय करावा.

आज हजारो वर्षांत विधवाविवाहाचा संप्रदाय चालू नाहीं, तेव्हां आतां तो पाडणें ह्मणजे केवळ नूतन गोष्ट आहे; त्यापक्षीं हा संप्रदाय प्रशस्त आहे असें सप्रमाण दाखवलें पाहिजे. कारण, तसें नसल्यास धर्मावर श्रद्धा ठेवणारे लोक तो पाडण्यास संमति देणार नाहींत. यास्तव अगोदर या संप्रदायाचें प्राशस्त्य सिद्ध केलें पाहिजे. पण तें केवळ युक्तीनें सिद्ध करून काय फळ? धर्म संबंधी गोष्टींस धर्मशास्त्राधार असल्या शिवाय केवळ युक्ति लागू करू-

नां तिज प्रमाणें त्या करणें हें आमचे लोक कधींच मान्य करणार नाहींत. तर त्या संप्रदायास धर्मशास्त्राधारच असला पाहिजे. कारण, हिंदु लोकांमध्यें अशा प्रकारच्या गोष्टींस बलवत्तर आधार धर्मशास्त्रच होय. आणि धर्मशास्त्र संमत ज्या गोष्टी आहेत त्याच प्रशस्त अशा मानिल्या आहेत. तेव्हां विधवाविवाह धर्मशास्त्रास संमत आहे कीं असंमत आहे याचा निर्णय अधीं केला पाहिजे.

धर्मशास्त्र असें कोण कोणाच्या ग्रंथास ह्मणावें, या विषयीं **याज्ञवल्क्य** संहितेच्या प्रथम अध्यायांत सांगितलें आहे. तें या प्रमाणेंः—

**मन्वत्रिविष्णुहारीत याज्ञवल्क्योशनोऽङ्गिराः।**
**यमापस्तम्बसंवर्त्ताः कात्यायनबृहस्पती ॥**
**पराशरव्यासशंखलिखिता दक्षगोतमौ ।**
**शातातपोवसिष्ठश्च धर्मशास्त्रप्रयोजकाः ॥**

"**मनु, अत्रि, विष्णु, हारीत, याज्ञवल्क्य, उशना, अंगिरा, यम, आपस्तंब, संवर्त्त, कात्यायन, बृहस्पति, पराशर, व्यास, शंख, लिखित, दक्ष, गोतम, शातातप आणि वसिष्ठ** हे धर्मशास्त्रग्रंथकर्त्ते होत."

या ऋषींनीं केलेल्या शास्त्रास धर्मशास्त्र ह्मणावें.* हिंदुलोक या शास्त्रांत जे धर्म सांगितले आहेत ते मानतात. आणि कोणती हीं गोष्ट या शास्त्रांस संमत असल्यास ती प्रशस्त आणि संमत नसल्यास अप्रशस्त असें मानतात. या

---

* यां खेरीज नारद, बोधायन व आणखी दुसरे चौदा ऋषि यांनीं केलेल्या शास्त्रासही धर्मशास्त्र ह्मणतात.

रून विधवाविवाह जर या शास्त्रांस संमत असेल तर त्या चा अंगीकार केला जाईल, आणि नसेल तर परित्याग केला जाईल.

सर्व धर्मशास्त्रांत सांगितलेले धर्म सर्व युगांत आचरावे किंवा युगभेदें करून त्यांची कांहीं व्यवस्था आहे, या विषयीं **मनु** स्मृति पुढें लिहिल्या प्रमाणें आहे:—

**अन्येकृतयुगे धर्मास्त्रेतायां द्वापरेऽपरे ।**
**अन्येकलियुगे नृणां युगह्रासानुरूपतः ॥**

"कृतयुगापासून कलियुगापर्यंत मनुष्याची शक्ति कमी कमी होत जाते; तिच्या प्रमाणानें कृतयुगांतले धर्म निराळे, त्रेतायुगांतले निराळे, द्वापारयुगांतले निराळे आणि कलियुगांतले निराळे."

ह्मणजे पूर्वींच्या तीन युगांतल्या लोकांनीं जे धर्म आचरले ते या कलियुगांतल्या लोकांच्यानें आचरवत नाहींत; कारण, मनुष्याच्या शक्तीचा दरएक उत्तरोत्तर युगांत क्षय होतो. त्रेतायुगांतल्या लोकांस सत्य* युगांतले धर्म आचरण्यास शक्ति नव्हती, द्वापारयुगांतल्यांस सत्य युगांतले व त्रेतायुगांतले धर्म आचरण्याची शक्ति नव्हती, आणि कलियुगांतल्यांस सत्य, त्रेता आणि द्वापार या तिन्ही युगांतले धर्म आचरण्यास शक्ति नाहीं.

यावरून स्पष्ट दिसतें कीं, कलियुगांतील लोक पूर्वींच्या तीन युगांतले धर्म आचरण्यास असमर्थ आहेत. तर आतां कलियुगांतल्या लोकांनीं धर्म कोणते आचरावे? **मनूनें**

* कृतयुग आणि सत्ययुग हे पर्यायशब्द आहेत.

फक्त निरनिराळ्या युगांत निरनिराळे धर्म आहेत इतकेंच सांगितलें आहे. पण ते निरनिराळे धर्म कोणते ते सांगितले नाहींत. **अत्रि, विष्णु, हारीत** इत्यादिकांच्या ग्रंथांत ही ते पार्थक्यें करून सांगितले नाहींत. या सर्वांनीं कांहीं धर्म सांगितले आहेत. परंतु युगभेदेंकरून मनुष्याची शक्ति कमी होते, तेव्हां कोणत्या युगांत कोणते धर्म आचरावे याचा विवेक असावा तो केला नाहीं. तो विवेक फक्त **पराशर** संहितेंत केलेला आढळतो. पराशर संहितेच्या प्रथम अध्यायांत पुढें लिहिल्याप्रमाणें आहेः—

**कृते तु मानवा धर्मास्त्रेतायां गौतमाः स्मृताः ॥**
**द्वापरे शांखलिखिताः कलौ पाराशराः स्मृताः ॥**

"**मनुस्मृतींत** सांगितलेले धर्म सत्ययुगांत आचरावे, **गोतमस्मृतींत** सांगितलेले धर्म त्रेतायुगांत आचरावे, **शंख** आणि **लिखित** यांच्या स्मृतींत सांगितलेले धर्म द्वापारयुगांत आचरावे, आणि **पराशरस्मृतींत** सांगितलेले धर्म कलियुगांत आचरावे."

म्हणजे सत्य, त्रेता आणि द्वापार या तीन युगांतल्या लोकांनीं **मनु, गोतम** आणि **शंख** व **लिखित** यांनीं प्रतिपादित धर्म यथाक्रम आचरले. आतां कलियुगांतल्या लोकांनीं **पराशर** प्रतिपादित धर्म आचरावे.* यावरून कलि-

---

* **मनु** प्रतिपादितच धर्म सत्ययुगांत, **गोतम** प्रतिपादितच त्रेतायुगांत, शंख व लिखित यांनीं प्रतिपादितच द्वापारयुगांत, आणि **पराशर** प्रतिपादितच कलियुगांत या प्रमाणें धर्म आचरावे असें म्हटलें तर दुसऱ्या ऋषींनीं प्रतिपादित धर्म कधीं आचरावे? तर मन्वादिकांचे धर्म सत्यादियुगांत विशेषतः सांगितले. परंतु या स्मृतिकर्त्यांस अविरुद्ध जे दुसऱ्या ऋषींचे धर्म ते सर्व युगांत आचरावे.

युगांत आचरावयाचे धर्म पराशरानें सांगितले आहेत. तेव्हां कलियुगांतल्या लोकांनीं त्याच्या धर्मशास्त्रास अनुसरावें असें स्पष्ट सिद्ध होतें.

पराशरसंहितेच्या आरंभींचा उपोद्घात पुढें लिहिला आहे; तो वाचून पाहिलाअसतां कलियुगांतले धर्म सांगण्याचाच पराशराचा उद्देश आहे असें निस्संशय लक्षांत येतें:—

अथातो हिमशैलाग्रे देवदारुवनालये ।
व्यासमेकाग्रमासीनमपृच्छन्नृषयः पुरा ॥
मानुषाणां हितं धर्मं वर्तमाने कलौ युगे ।
शौचाचारं यथावच्च वद सत्यवतीसुत ॥
तत्श्रुत्वा ऋषिवाक्यन्तु सशिष्योग्न्यर्कसन्निभः ।
प्रत्युवाच महातेजाः श्रुतिस्मृतिविशारदः ॥
नचाहंसर्व्वतत्त्वज्ञः कथं धर्मं वदाम्यहम् ।
अस्मत्पितैव प्रष्टव्य इति व्यासः सुतोऽवदत् ॥
ततस्ते ऋषयः सर्व्वे धर्मतत्वार्थकाङ्क्षिणः ।
ऋषिंव्यास पुरस्कृत्य गता बदरिकाश्रमम् ॥
नानावृक्षसमाकीर्णं फलपुष्पोपशोभितम् ।
नदीप्रस्रवणाकीर्णं पुण्यतीर्थैरलंकृतम् ॥
मृगपक्षिगणाढ्यंच देवतायतनावृतम् ।
यक्षगन्धर्व्वसिद्धैश्च नृत्यगीतसमाकुलम् ॥
तस्मिनृषिसभामध्ये शक्तिपुत्रं पराशरम् ।
सुखासीनं महात्मानं मुनिमुख्यगणावृतम् ॥
कृतांजलिपुटो भूत्वा व्यासस्तु ऋषिभिः सह ॥

प्रदक्षिणाभिवादैश्च स्तुतिभिः समपूजयत् ॥
अथसन्तुष्टमनसा पराशरमहामुनिः ।
आह सुस्वागतं ब्रूहीत्यासीनो मुनिपुंगवः ॥
व्यासः सुस्वागतं ये च ऋषयश्च समन्ततः ।
कुशलं कुशलेत्युक्त्वा व्यासः पृच्छत्यतः परम् ॥
यदि जानासि मे भक्तिं स्नेहाद्वा भक्तवत्सल ।
धर्मं कथय मे तात अनुग्राह्योह्यहं तव ॥
श्रुता मे मानवा धर्मा वासिष्ठाः काश्यपास्तथा ।
गार्गेया गौतमाश्चैव तथाचौशनसाः स्मृताः ॥
अत्रेर्विष्णोश्च सांवर्त्ता दाक्षाआंगिरसास्तथा ।
शातातपाश्च हारिता याज्ञवल्क्यकृताश्च ये ॥
कात्यायनकृताश्चैव प्राचेतसकृताश्चये ।
आपस्तम्ब कृता धर्माः शखंस्य लिखितस्यच ॥
श्रुता ह्येते भवत्प्रोक्ताः श्रुतार्थास्ते न विस्मृताः ।
अस्मिन् मन्वन्त्तरे धर्माः कृतत्रेतादिके युगे ॥
सर्व्वे धर्माः कृते जाताः सर्व्वे नष्टाः कलौयुगे ।
चातुर्वर्ण्यसमाचारं किंचित् साधारणं वद ॥
व्यासवाक्यावसाने तु मुनिमुख्यः पराशरः ।
धर्मस्य निर्णयं प्राह सूक्ष्मं स्थूलंच विस्तरात् ॥

"पुरातन काळीं ऋषीनीं **व्यासास** विंनंती केली कीं हे **सत्यवती** सुता **व्यासा**, कलियुगांत मनुष्यास हितावह असे धर्म व आचार कोणते ते सांग. ऋषींचें हें भाषण ऐकून **व्यास** म्हणाला, सर्व गोष्टींचें तत्व मला माहित नाहीं तेव्हां मी कलिधर्म कसा सांगूं. हा धर्म सांगण्याविषयीं

पिता **पराशर** याची प्रार्थना केली पाहिजे. नंतर सर्व ऋषि **पराशराच्या** आश्रमाप्रत **व्यासा**सहवर्तमान गेले, आणि हात जोडून प्रदक्षिणा नमस्कार करून त्यांनीं **पराशराची** स्तुति केली. **पराशरानें** संतुष्ट होऊन त्यांचा आदर सत्कार करून त्यांस कुशलप्रश्न केले; त्यावरून त्यांनीं कुशल आहों अशीं उत्तरें दिलीं. नंतर **व्यास** म्हणाला, हे तात, सत्य, त्रेता, द्वापार या युगांचे मन्वा दिकांनीं सांगितलेले विशेष धर्म मी तुज पासून ऐकले आहेत. ते मी विसरलों नाहीं. सत्य युगांत सर्व धर्म उत्पन्न झाले व कलियुगांत ते सर्व नष्ट झाले. तेव्हां आतां ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र या चारी वर्णांचे अगदीं साधारण धर्म कोणते तेवढे सांग. याप्रमाणें **व्यासाचें** भाषण संपल्यावर **पराशर** विस्तारें करून धर्म सांगूं लागला."

**पराशरसं**हितेच्या दुसऱ्या अध्यायाच्या प्रारंभीं हीकलियुगांतलेच विशेष धर्म सांगण्याविषयीं **पराशराचा** निश्चय स्पष्ट दिसतो. तो असाः—

**अतःपरं गृहस्थस्य धर्माचारं कलौयुगे ।**
**धर्मं साधारणं शक्यं चातुर्व्वर्ण्याश्रमागतम् ॥**
**संप्रवक्ष्याम्यहंपूर्वं पराशरवचो यथा ॥**

"गृहस्थ ( म्हणजे गृहस्थाश्रमी ) यानें कलियुगांत कोणते धर्म व कोणते आचार करावे हें आतां मी सांगतों. चार वर्णांतल्या व चारआश्रमांतल्या लोकानीं आचरावयास शक्य जे साधारण धर्म ते मी **पराशर** यानें प्राचीन काळीं जसे सांगितले तसे आतां सांगतों."

यावरून कलियुगांत धर्म व आचार यांचें निर्णायक शास्त्र **पराशरसंहिता** हीच होय या विषयीं तिलप्राय संशय उरला नाहीं. आतां या संहितेच्या चवथ्या आध्यायांत विधवांस धर्म व आचार सांगितले आहेत ते असेः—

**नष्टे मृते प्रव्रजिते क्लीबे च पतिते पतौ ।**
**पञ्चस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते ॥**
**मृते भर्तरि या नारी ब्रह्मचर्य्ये व्यवस्थिता ।**
**सा मृता लभते स्वर्गं यथा ते ब्रह्मचारिणः ॥**
**तिस्रः कोट्योऽर्द्धकोटी च यानि लोमानि मानवे ।**
**तावत् कालं वसेत् स्वर्गं भर्त्तारं यानुगच्छति ॥**

"पतीचा पत्ता लागेनासा झाला, पति मृत्यु पावला, संन्यस्त झाला, नपुंसक निपजला, अथवा पतित झाला तर या पांचही प्रसंगीं स्त्रीनें अन्य पति वरावा. जी स्त्री पति मेल्यानंतर ब्रह्मचर्यव्रतानें राहते तिला ब्रह्मचाऱ्या प्रमाणेंच स्वर्गसुख प्राप्त होतें. पतीच्या मरणानंतर त्याज बरोबर सती जाणारी स्त्री मनुष्याच्या शरीरावर साडेतीन कोट केंस आहेत तितका काळ पावेतों ( म्हणजे कोट्यावधि वर्षें ) स्वर्गवास करिते."

याप्रमाणें विधवेस विवाह, ब्रह्मचर्य व्रत अथवा सहगमन असे तीन प्रकारचे धर्म **पराशरानें** सांगितले आहेत. त्यां पैकीं सहगमनाची चाल तर प्रस्तुतच्या सरकारच्या हुकमानें बंदच झाली, तेव्हां अर्थात विधवेस विवाह करणें अथवा ब्रह्मचर्यानें राहणें हे दोनच मार्ग राहिले. परंतु कलियुगांत ब्रह्मचर्यानें राहणें हें विधवांस अत्यंत कठिण, हें-

अंतःकरणांत उमजूनच जगद्धितकर्त्या **पराशर ऋषींनें** प्रथम प्रकार विवाहाचाच सांगितला. अस्तु, हंशील इतकेंच समजावयाचें कीं, कलियुगांत या पांच प्रकारच्या अडचणी आल्या असतां स्त्रीनें विवाह करावा असा धर्म **पराशर** सांगतो, त्या अर्थीं कलियुगांत विधवाविवाह शास्त्रसंमत आहे.

कलियुगांत विधवाविवाह सशास्त्र आहे हें सिद्ध झाल्या नंतर आतां विधवेस पुनर्विवाहोतर झालेल्या मुलास †पौनर्भव म्हणावें किंवा नाहीं या गोष्टीचा निर्णय **पराशर** संहितेंतच केला आहे. पुर्वींच्या युगांत निरनिराळे बारा प्रकारचे पुत्र धर्मशास्त्रांत अधिकारी सांगितले आहेत. परंतु कलियुगांत **पराशरानें** त्यांपैकीं तीन ठेवून बाकीचे रद्द केले. तीन ठेविले तेः—

**औरसःक्षेत्रजश्चैव दत्तः कृत्रिमकः सुतः।**

"औरस, दत्तक आाणि कृत्रिम.*"

याप्रमाणें कलियुगांत पराशरानें तीन प्रकारचे पुत्र सांगितले. एक औरस ह्मणजे पोटीं झालेला, एक दत्तक म्हणजे मांडीवर पोष्णा घेतलेला आणि एक कृत्रिम म्हणजे कृतीनें केलेला. तो पौनर्भवाचें ग्रहणच करित नाहीं. पण ज्या अर्थीं तो विधवाविवाहाचें विधान करतो त्या अ-

---

†दुसऱ्यानें विवाह केलेल्या स्त्रीपासून झालेला पुत्र. प्राचीन युगांत पौनर्भवयास कमी प्रतीचा पुत्र मानीत असत.

*मूल वाक्यांत चार प्रकारचे पुत्र सांगितले आहेत. परंतु दत्तकमीमांसेत नंद पंडित यांनीं या वाक्याची व्याख्या करून कलियुगांत औरस, दत्तक आणि कृत्रिम असे तीनच पुत्र आहेत असें स्थापन केलें आहे त्याचेंच अनुसरण येथें केलें आहे.

र्थी तिजपासून पुढें झालेला पुत्र यथाशास्त्र म्हणजे कायदेशीर वारस आहे असें ध्वनित करतो.

आतां या पुत्रास म्हणावें काय? औरस, किंवा दत्तक, किंवा कृत्रिम अशी शंका आहे. त्यांपैकीं यास दत्तक अथवा कृत्रिम या दोहोंतून एकही म्हणतां येत नाहीं. कारण, दुसऱ्या मनुष्याचा मुलगा शास्त्रोक्त विधीप्रमाणें पोष्णा घेतला असतां त्याविधीच्या दोनरीतींच्या अनुष्ठानांप्रमाणें त्यास दत्तक आणि कृत्रिम अशा दोन संज्ञा आहेत. परंतु विधवेशीं विवाह केल्यावर तिजपासून त्याविवाह करणारासच जो स्वतः पुत्र झाला तो दुसऱ्या मनुष्याचा नव्हे ; यास्तव वरील दोन संज्ञांपैकीं त्यास एकही लागू नाहीं. दत्तक (दिलेला) आणि कृत्रिम (केलेला) यांचीं स्मृतींत सांगितलेलीं लक्षणें, कोणा एकानें विधवेशीं पुनर्विवाह केल्या नंतर तिजपासून त्यास झालेल्या पुत्रास लावतां येत नाहींत; तर त्यास औरस (पोटीं झालेल्या) पुत्राचेंच लक्षण लागू होतें असें खालच्या स्मृतीं वरून स्पष्ट दिसतें:—

**माता पिता वा दद्यातां यमद्भिः पुत्रमापदि ।**
**सदृशं प्रीतिसंयुक्तं स ज्ञेयो दत्त्रिमः सुतः ॥**

"आईनें अथवा बापानें, ज्यास पुत्र नाहीं, अशा सजातीय मनुष्यास शास्त्रविधीनें संतोषें करून दिलेला जो पुत्र तो (त्या घेणाराचा) दत्तक होय."

**सदृशन्तु प्रकुर्याद्यं गुणदोषविचक्षणम् ।**
**पुत्रं पुत्रगुणैर्युक्तं स विज्ञेयस्तु कृत्रिमः ॥**

"पुत्राच्या धर्मानें युक्त व गुणदोष जाणणाऱ्या अशा मुलाचें, एखादा सजातीय पुरुषानें पुत्राप्रमाणें ममतेनें पालन पोषण केलें असतां तो पुत्र (त्या पालन करणाऱ्याचा) कृत्रिम होय."

**स्वक्षेत्रे संस्कृतायान्तु स्वयमुत्पादयेद्धियम् ।**
**तमौरसं विजानीयात् पुत्रं प्रथमकल्पितम् ॥**

"कोणा एकाचा स्वजातीच्या स्त्रीशीं विवाह होऊन त्यासच त्या स्त्री पासून जो पुत्र होतो तो त्या मनुष्याचा औरस (स्वशरीरापासून निर्माण झालेला) पुत्र होय. हा पहिल्या प्रतीचा पुत्र होय."

हें वरील वचन रूप लक्षण, स्वजातीच्या विधवेशीं विवाह केल्यावर तिजपासून स्वतः त्या विवाह करणाऱ्यास जो पुत्र होईल त्यास पूर्णपणें लागू होतें.

**पराशर** संहितेंत विधवाविवाहाचें विधान केलें आहे, आणि बारा प्रकारच्या पुत्रांतून कलियुगांत तीन प्रकारचेच पुत्र कायदेशीर ह्मणून सांगितले आहेत; त्यांपैकीं दत्तक व कृत्रिम या दोघांचीं वरील लक्षणें, स्वजातीच्या विधवेशीं लग्न करणारास तिजपासून झालेल्या पुत्रास मुळींच लागू होत नाहींत व औरस पुत्राचेंच लक्षण पूर्णपणें लागू होतें. या सर्व कारणांवरून त्यास औरस पुत्र ह्मणण्यास आम्हास पक्का आधार आहे. पूर्वींच्या युगांत पौनर्भव ह्मणून एक प्रकारचा पुत्र होताच; तोच पौनर्भव शब्द विवाहित विधवेपासून झालेल्या पुत्रास लावण्याचा **पराशराचा** अभिप्राय असेल, असें तर ह्मणतांच येत नाहीं. कारण, कलियुगांत वर

सांगितलेल्या प्रकारच्या पुत्रास पौनर्भव हेंच नांव देणें त्यास विवक्षित असतें तर त्यानें कलियुगांत निरनिराळ्या प्रकारचे कायदेशीर पुत्र सांगितले त्यांत त्याचें ही परिगणन खचीत केलें असतें. परंतु सगळ्या पराशर संहितेंत पौनर्भव शब्द मुळींच आढळत नाहीं. यावरून स्वजातिय विधवेशीं विवाह करणारास तिजपासून जो पुत्र होईल त्यास पौनर्भव असें न मानतां औरसच मानलें पाहिजे.

वरील प्रमाणांवरून कलियुगांत विधवाविवाह शास्त्रसंमत आहे हें सिद्ध झालें. आतां **पराशरसंहिते** खेरीज धर्मशास्त्राच्या दुसऱ्या एखाद्या ग्रंथांत कलियुगांत विधवाविवाहाचा विषयीं निषेध केला आहे कीं काय हें पाहिलें पाहिजे. कारण, पुष्कळांचें ह्मणणें असें आहे कीं, पूर्वींच्या युगांत विधवाविवाह प्रचारांत होता ; परंतु कलियुगांत तो निषिद्ध केला आहे. तर कलियुगासच लागू असे जे धर्म तेच **पराशरसंहितें**त सांगितले आहेत आणि त्याच धर्मांत विधवाविवाहाचा संग्रह स्पष्ट रीतीनें केला आहे. यास्तव कलियुगांत विधवांस विवाहाचा निषेध आहे असें स्थापन करितां येत नाहीं असें आहे; तेव्हां आतां विधवाविवाह न करण्या विषयीं काय सबल प्रमाण असेल तें एक निषेधवादींसच माहीत असेल दुसऱ्या कोणास नाहीं

**स्मार्तभट्टाचार्य रघुनंदन** यानें विवाहावरील निबंधांत बृहन्नारदीयपुराण व आदित्यपुराण यांतून घेतलेलीं वचनें कलियुगांत विधवाविवाहाचा निषेध करणारीं आहेत असें

कांहीं लोकांचें मत आहे. या करितां तीं वचनें खालीं उतरून घेऊन त्यांची व्याख्या व तात्पर्य लिहितों:—

बृहन्नारदीय पुराण.

समुद्रयात्रास्वीकारः कमंडलुविधारणम् ।
द्विजानामसवर्णासु कन्यासूपयमस्तथा ॥
देवरेणसुतोत्पत्तिर्मधुपर्के पशोर्वधः ।
मांसादनं तथा श्राद्धे वानप्रस्थाश्रमस्तथा ॥
दत्तायाश्चैव कन्यायाः पुनर्दानं परस्य च ।
दीर्घकालं ब्रह्मचर्यं नरमेधाश्वमेधकौ ॥
महाप्रस्थानगमनं गोमेधंच तथा मखम् ।
इमान् धर्मान् कलियुगे वर्ज्यानाहुर्मनीषिणः ॥

"समुद्र पर्यटन करणें; सन्यास घेणें; विजातीय कन्यां बरोबर द्विजांनीं विवाह करणें; भावजईच्याठायीं दिरानें पुत्रोत्पत्ति करणें; मधुपर्कामध्यें, ह्मणजे अतिथीला द्यावयाच्या मेजवानीमध्यें, पशु मारणें; श्राद्धांत मांस खाणें; वानप्रस्थाश्रम घेणें; एकास दिलेली कन्या पुनः दुसऱ्यास देणें; बहुत काळपर्यंत ब्रह्मचारी राहणें; नरमेध, अश्वमेध व गोमेध ( ज्यांमध्यें यथाक्रम मनुष्याचा, घोड्याचा आणि बैलाचा हे वध आहेत असे) हे यज्ञ करणें; प्राण जाईपर्यंत यात्रा करणें; हे धर्म कलियुगांत निषिद्ध आहेत असें विद्वानांचें ( ऋषींचें ) मत आहे."

या वचनांत विधवाविवाहनिषेधपर एक ही वचन आढळत नाहीं. "एकास दिलेली कन्या पुनः दुसऱ्यास देणें" निषिद्ध आहे या वचनाच्या जोरावर जे निषेध स्थापन करूं इच्छितात त्यांस या वाक्याचें प्रमेय कळलें नाहीं.

एका वरास वाचेनें दिलेली कन्या, त्यापेक्षां चांगल्या गुणांचा दुसरा वर मिळाल्यास त्याला देण्याचा संप्रदाय पूर्वींच्या युगांत होता. याविषयीं वचनः—

**सकृत् प्रदीयते कन्या हरंस्तां चौरदंडभाक् ॥**
**दत्तामपि हरेत् पूर्वात् श्रेयांश्चेद्वर आव्रजेत्* ॥**

"कन्येचें दान करणें हें एकदांच; आणि एकदां दिल्यानंतर माघारी घेणारा चोराच्या दंडास पात्र होतो. परंतु पूर्वींच्या वरापेक्षां दुसरा विशेष चांगला वर आला तर (त्यास देण्यासाठीं) ही दिलेली कन्या परत घ्यावी."

वाचादत्त झालेली कन्या दुसरा विशेष चांगला वर मिळाल्यास त्यास देण्याचा जो शास्त्रसंमत संप्रदाय पूर्वींच्या युगांत चालू होता त्याचा मात्र निषेध बृहन्नारदीय पुराणांत केला आहे. यास्तव या वचनाचा अर्थ ओढून ताणून कलियुगांत विधवाविवाह निषेधपर लावणें हें असंगत आहे. दुसरें, असें कीं, पराशरसंहितेंत विधवाविवाहाचें स्पष्ट विधान केलें असतां त्याच्या विरुद्ध ह्या पुराण वचनाचा अर्थ काढणें हें अगदीं विरुद्ध आहे.

आदित्य पुराण.

**दीर्घकालं ब्रह्मचर्य्यं धारणंच कमंडलोः ॥**
**देवरेण सुतोत्पत्तिर्दत्ता कन्या प्रदीयते ॥**
**कन्यानामसवर्णानां विवाहश्च द्विजातिभिः ।**
**आततायिद्विजाग्र्याणां धर्म्ययुद्धेन हिंसनम् ॥**
**वानप्रस्थाश्रमस्यापि प्रवेशो विधिदेशितः ।**

---

* याज्ञवल्क्य संहिता. अध्याय १.

वृत्तस्वाध्यायसापेक्षमघसंकोचनं तथा ॥
प्रायश्चित्तावधानंच विप्राणांमरणांतिकम् ॥
संसर्गदोषः पापेषु मधुपर्के पशोर्वधः ॥
दत्तौरसेतरेषांतु पुत्रत्वेन परिग्रहः ॥
शूद्रे ु दासगोपालकुलामित्रार्द्ध सीरिणाम् ॥
भोज्यान्नता गृहस्थस्य तीर्थसेवातिदूरतः ॥
ब्राह्मणादिषुशूद्रस्यपक्कतादिक्रियापिच ॥
भृग्वाग्निपतनंचैव वृद्धादिमरणं तथा ॥
एतानि लोकगुप्त्यर्थं कलेरादौ महात्माभिः ॥
निवर्त्तितानि कर्माणिव्यवस्थापूर्वकं बुधैः ॥

"बहुत कालपर्यंत ब्रह्मचारी राहणें; सन्यास घेणें; भावजईच्या ठायीं दिरानें पुत्रोत्पत्ति करणें; दिलेली कन्या पुनः देणें; विजातीय कन्यांबरोबर द्विजांनीं विवाह करणें; नाश करण्याकरितां उद्युक्त झालेल्या ब्राह्मणांस धर्मयुद्धें करून मारणे; वानप्रस्थाश्रम घेणें; वेदांतील विद्वत्ता व आंगचें पावित्र्य यांच्या प्रमाणानें अशौचाची मुदत कमी करणें; ब्राह्मणास दहांत प्रायश्चित्त देणें; पतितांशीं संसर्ग करण्याबद्दलचा दोष धरणें; मधुपर्कामध्यें पशु मारणें; दत्तक व औरस ह्या दोघां खेरीज इतर पुत्रांचें पुत्रत्वें करून ग्रहणकरणें; शूद्र जातींतील दास, गोपाल, कुलमित्र आणि अर्धसीरि यांनीं दिलेलें अन्न (भक्षणीय पदार्थ) गृहस्थाश्रमांत असणाऱ्या द्विजानें खाणें; दूरदेशच्या तीर्थांची यात्रा करणें; ब्राह्मणादिकांचा सैपाक शूद्रानें करणें; कड्यावरून खालीं घालून घेणें; अग्नि प्रवेश करणें; वृद्ध वगैरे मनुष्यां-

नीं स्वेच्छें करून मरणाच्या निश्चयानें प्रायोपवेशानीं बसणें; ह्या गोष्टी विचारी व महात्मे अशा पुरुषांनीं लोकांच्या संरक्षणार्थ कलीच्या आरंभीं कायद्यानें बंदकरून टाकल्या."

यावचनांमध्यें ही विधवांच्या विवाहाचा निषेध करणारें वाक्य कोठें आढळत नाहीं. दिलेल्या कन्येचें दान पुनः करण्याविषयींचा निषेध विधवाविवाहाविषयीं लावतां येत नाहीं, हें बृहन्नादीय पुराणांतील सजातीय वाक्याचा विचार करतेवेळीं दाखवलेंच आहे.

औरस व दत्तक या दोन पुत्रांखेरीज इतरांच्या पुत्रीकरणाचा निषेध आदित्य पुराणांत आहे; त्यावरून विधवाविवाहाचा निषेध सिद्ध होतो असें कांहीं लोकांचें ह्मणणें आहे. तो निषेध सिद्ध करण्याचा प्रकार, "विवाहित विधवेपासून झालेल्या पुत्रास पूर्वींच्या युगांत पौनर्भव असें ह्मणत असत. कलियुगांत औरस व दत्तक यां खेरीज इतर पुत्राचा स्वीकार करण्याचा निषेध आहे तो पौनर्भव पुत्रास ही लागू आहेच. आतां विवाहाचा हेतु पुत्र संतान व्हावें हा आहे. आणि विवाहित विधवेपासून झालेल्या पुत्राचा पुत्रत्वेंकरून स्वीकार करण्यास निषेध आहे तेव्हां विधवेच्या विवाहाचा निषेध सिद्ध झालाच." हें ह्मणणें आपाततः सयुक्तिक दिसतें; आणि पराशर संहितेंतील वचन नसतें तर या युक्तीनें विधवाविवाहाच्या निषेधाचें स्थापन झालें असतें; परंतु ज्यांचें हें वरील बोलणें आहे त्यांनीं पराशरसंहिता पाहिली नाहीं असें वाटतें. विवाहित विधवेपासून झालेल्या पुत्रास पूर्वींच्या युगांत पौनर्भव ह्मणत होते.

खरे. परंतु कलियुगांत त्या पुत्रास पौनर्भव शब्द लावावा न लावावा या विषयीं जें मागें लिहिलें आहे त्यावरूनच पौनर्भव व औरस यांच्या मधली तफावत आतां उरली नाहीं असें सिद्ध झालें आहे. तेव्हां शास्त्ररीत्या विवाहित विधवेपासून झालेला पुत्र कलियुगांत पौनर्भव असा न मानितां औरस असाच मानिला तर मग औरस व दत्तक या दोघां खेरीज इतर पुत्रांच्या स्वीकाराचा जो कलियुगांत निषेध आहे त्यापासून कलियुगांत विधवांच्या विवाहाचा निषेध कसा सिद्ध होईल.

बृहन्नारदीयपुराण व आदित्यपुराण यांतील वचनें घेऊन त्यांच्या तात्पर्याचा विचार वर केला आहे. त्यावरून तीं कलियुगांत विधवाविवाहाचा निषेध करीत नाहींत असें स्पष्ट दिसतें. परंतु वरील विचारापासून निषेधवादींचें समाधान नहोतां ते वरील निषेधांवरून विधवांचा विवाह शास्त्र विरुद्ध आहे असे मांडतील तर पुढें लिहिल्याप्रमाणें विचार केला पाहिजे. तो असाः—विधवांच्या विवाहाचा पराशर संहितेत विधि केला आहे, परंतु बृहन्नारदीय व आदित्य या पुराणांत निषेध केला आहे. या दोहोंत बलवत्तर आधार कोणता? ह्मणजे विधवाविवाह पराशराच्या आज्ञेप्रमाणें शास्त्रसंमत मानावा किंवा बृहन्नारदीय व आदित्य या पुराणांतल्या निषेधांप्रमाणें शास्त्रविरुद्ध मानावा?

या गोष्टीचा उलगडा होण्याकरितां, परस्परांस विरुद्ध अशीं दोन जातींचीं प्रमाणें असल्यास त्यांतून अमुक बलवत्तर मानावयाचें याविषयीं आमच्या शास्त्रकर्त्यांचा काय

निर्णय आहे हें पाहिलें पाहिजे. वेदव्यासानें आपल्या स्मृतीमध्यें याचा उलगडा केला आहे. तो असाः—

**श्रुतिस्मृतिपुराणानां विरोधो यत्रदृश्यते ॥**
**तत्रश्रौतं प्रमाणंतु तयोर्द्वैधे स्मृतिर्वरा ॥**

"वेद, स्मृति व पुराण यांचा परस्परांशीं विरोध असल्यास वेद बलवत्तर; आणि स्मृति व पुराण यांचा परस्परांशीं विरोध असल्यास स्मृति बलवत्तर.".

ह्मणजे वेदाज्ञा एकाप्रकारची, स्मृतींची आज्ञा दुसऱ्या प्रकारची आणि पुराणांची आज्ञा तिसऱ्याच प्रकारची असें असलें तर काय करावें? प्रमाण कोणतें मानावें? मनुष्यास तीं तीन्ही प्रमाणभूत आहेत; त्यांतून एकासच तो अनुसरला तर दुसऱ्या दोहोंची अवज्ञा होईल; आणि शास्त्राची अवज्ञा केल्यामुळें त्यास पातक लागेल अशी मोठी अडचण आहे. हिचें निवारण वेदव्यासानें असें केलें आहे कीं, वेद-स्मृति व पुराण एकमेकाशीं विरुद्ध असल्यास स्मृति व पुराण यांच्या आज्ञा न मानतां वेदाज्ञे प्रमाणें वागावें; आणि स्मृति व पुराण यांचा परस्पराशीं विरोध असल्यास पुराणाची आज्ञा न मानतां स्मृतीच्या आज्ञेप्रमाणें वागावें.

आतां पाहा, प्रथम बृहन्नारदीय व आदित्य या पुराणांचें तात्पर्यवर्णन केलें आहे, त्यावरून तीं विधवांच्या विवाहाचा निषेध करणारीं आहेत असें मुळींच होत नाहीं. दुसरें, त्यांच्या अर्थाची ओढाताण करून तीं निषेध कारकच आहेत असा आग्रह धरल्यास बृहन्नारदीय व आदित्य हीं पुराणें आणि पराशरसंहिता यांच्या मध्यें उघड विरोध आ-

ला; ह्मणजे पराशरसंहिता कलियुगामध्यें विधवांच्या विवाहाचें विधान करते, आणि बृहन्नारदीय व आदित्य हीं पुराणें निषेध करतात. परंतु पराशरसंहिता ही स्मृति आहे आणि बृहन्नारदीय व आदित्य हीं पुराणें आहेत. आणि स्मृति व पुराणें यांचा परस्परांशीं विरोध आल्यास पुराणें सोडून स्मृतींचेंच अवलंबन करावें असें पुराणकर्त्यांचेंच वचन आहे. यावरून बृहन्नारदीय व आदित्यपुराणें कलियुगांत विधवांच्या विवाहाचा निषेध करणारीं असें असलें तरी तीं अगदीं सोडून देऊन पराशरसंहितेंत विधवाविवाहाचा विधि केला आहे त्याचाच अंगीकार आपण करावा.

विधवांचा विवाह आमच्या शास्त्रास संमत आहे हें यावरून निर्विवाद सिद्ध झालें. परंतु आतां दुसरी हरकत अशी आहे कीं, विधवाविवाह शास्त्र संमत आहे तरी रुढिविरुद्ध आहे, सबब तो करतां कामा नये ही हरकत निवारण्याकारितां, रुढीचें प्रमाणत्वें करून अवलंबन कोठें करावें हें पाहिलें पाहिजे. वसिष्ठानें आपल्या स्मृतीमध्यें या गोष्टीचा उलगडा केला आहे. तो असाः—

**लोके प्रेत्य वा विहितो धर्मः ।**
**तदलाभे शिष्टाचारः प्रमाणम् ॥**

"इहलोकसंबंधी अथवा परलोकसंबंधी गोष्टींमध्यें शास्त्रविहित धर्माचें आचरण करावें. परंतु शास्त्रविधि नसल्यास रुढि प्रमाण धरावी." ह्मणजे शास्त्र प्रतिपादित धर्माचें मनुष्यांनीं आचरण करावें; आणि ज्या गोष्टींविषयीं शास्त्रांत विधि नाहीं व निषेध ही नाहीं, पण ज्या आपले

शिष्ट पूर्वज परंपरया करीत आले आहेत त्या गोष्टी शास्त्र विहित धर्माप्रमाणेंच प्रमाणभूत समजाव्या. आतां कलि-युगांत विधवाविवाहाचा विधि पराशरसंहितेंत स्पष्ट केला आहे, तेव्हां तो रुढिविरुद्ध आहे एवढ्यावरून तो अवैध आहे हें ह्मणणें सयुक्तिक नव्हे व शास्त्रसंमत ही नव्हे. कारण जेथें शास्त्राधार नाहीं तेथेंच रुढि प्रमाण, असें वसि-ष्ठानें सांगितलें आहे. यावरून कलियुगांत विधवाविवाह करण्याविषयीं कोणतीच हरकत राहिली नाहीं हें अगदीं उघडपणें सिद्ध झालें.

बाळपणीं वैधव्य प्राप्त झाल्यापासून होणारीं जीं असह्य दु:खें त्यांची कल्पना, ज्यांच्या मुलींचे, बहिणींचे, सुनांचे, अथवा दुसऱ्याजवळच्या संबंधी स्त्रियांचे नवरे बाळपणीं वारले आहेत, त्यांच्या मात्र मनांत बरोबर येईल. ब्रह्मच-र्याच्या धर्माचें आचरण हातून न झाल्यामुळें शेंकडो विधवा जारिणी झाल्या आहेत व त्यांनीं गर्भनाश करून आपल्या पित्याच्या, मातेच्या व पतीच्या कुलांस कलंक लाविले आहेत. विधवाविवाह चालू केला असतां वैधव्या पा-सून आमरणांत होणाऱ्या असह्य यातनांचें निवारण हो-ईल; जारकर्माचे व गर्भनाशाचे गुन्हे कमी होतील; आणि त्यांपासून अनेक कुलांची अप्रतिष्ठा होऊन त्यांस कलंक लागतो तो लागणार नाहीं. आणि जेथपर्यंत या हितावह चालीचा लोक अंगीकार करणार नाहींत तोंपर्यंत कसबि-णीचा व्यापार, व्यभिचार, अगम्यगमन व भ्रूणहत्या (गर्भ-नाश) या गोष्टींचे गुन्हे उत्तरोत्तर नेहेमी वाढत जातील,

कुलांचे कलंक वाढत जातील; आणि विधवांचा दुःखाग्नि अधिक अधिक पेटेल.

शेवटीं मी लोकांस विनयपूर्वक अशी विनंती करितों कीं, या गोष्टींकडे त्यांनीं चांगलें लक्ष्य द्यावें आणि विधवांचा विवाह शास्त्रांस संमत आहे याविषयीं ज्या गोष्टी वर लिहिल्या आहेत त्या सर्वांचा चांगला विचार करावा आणि मग विधवांचा विवाह चालू असावा किंवा नसावा याविषयीं निर्णय करावा.



# हिंदु विधवाविवाह.

## प्रत्युत्तर.

विधवांचा विवाह करण्याची चाल प्रवृत्तींत आणण्याचा विचार हिंदुलोकांस प्रथमच विदित केला तेव्हां मला अशी मोठी भीति वाटत होती कीं लोक त्याची अगदीं हेलना करतील; आणि मीं त्या विषयावर छापून प्रसिद्ध केलेल्या ग्रंथाचा हेतु व त्याचें नांव हींच तो लक्ष्यलावून न वाचण्याविषयींकारणीभूत होतील आणि तेणेंकरून माझे श्रम अगदीं निष्फळ होतील. पण हें माझें अनुमान अगदीं उलट होऊन हिंदु लोकांची हा ग्रंथ घेण्याविषयीं इतकी उत्सुकता दिसली कीं, हा प्रसिद्ध झाल्यानंतर एका आठवड्याच्या आंत त्याची दोन हजारांची पहिली आवृत्ति अगदीं खपून गेली. तेव्हां मोठ्या उमेदीनें दुसरी आवृत्ति तीन हजारांची काढली; ती ही थोड्याच काळांत बहुतेक खपून गेली. लोकांची एवढी उत्सुकता पाहून माझ्या मेहनतीचें चांगलें सार्थक झालें असें मी मानितों.

सर्व शास्त्री व इतरलोक ज्या विषयाची थट्टा व तिरस्कार करतील अशी भीति होती त्यावर मीं लिहिलेल्या ग्रंथांत ल्या गोष्टींचीं उत्तरें त्यांनीं मेहेरबानीं करून दिलीं आणि त्यांबद्दल मेहनत घेतली व द्रव्यही खरचलें यामुळें मला फार संतोष झाला. उत्तरें देणाऱ्यांमध्यें पुष्कळ लोक या देशांतील मोठे नामांकित प्रतिष्ठित, श्रीमान व विद्वान असे आहेत ही गोष्ट त्याहून अधिक संतोषास कारण झाली.

परंतु बहुतेक उत्तरें देणारांस अशाप्रकारच्या विषयावर वादविवाद करण्याची रीति माहीत नाहीं, यामुळें फार वाईट वाटतें. कांहींलोक विधवाविवाह हा शब्द ऐकल्यानेंच इतके रागावले कीं, त्यांचा सर्व विवेक गेला. आणि वादविवादामध्यें विवेक सुटल्यामुळें, प्रमेय जाणण्याकडे त्यांचें लक्ष्य पुरतें लागलें नाहीं, असें त्यांच्या उत्तरांवरून दिसून येतें. कांहीं एकांनीं त्याविषयाच्या साधकबाधकांचा विचार करण्याचें बुद्धिपुरःसर सोडून देऊन भलत्या सलत्या अप्रयोजक अनेक हरकती काढल्या. तथापि त्यांचा हेतु कांहीं अंशीं सिद्ध झाला. या देशांतील बहुत लोकांस शास्त्रांची माहिती नसल्यामुळें, शास्त्रीय वादविवादामध्यें वादी प्रतिवादी या उभयतांनीं आणलेलीं प्रमाणें व आधार यांचें तारतम्य पाहून कोणत्याही एखाद्या विषयाचें प्रमेय जाणण्याचें सामर्थ्य स्वतः त्यांच्या आंगीं नाहीं. कोणी कसाही अप्रयोजक जरी एखादा अडथळा काढला तरी ते संशयांत पडून अगदीं गोंधळून जातात. कितीएकांस माझा ग्रंथ वाचल्यानंतर, मी ज्या विषयाची वाटाघाट केली आहे तो शास्त्रसंमत आहे असें वाटलें; पण त्यावर लोकांनीं कांहीं दूषणें काढतांच तीं ही खरींशीं वाटलीं. आणखी एतद्देशीय पुष्कळ लोकांस संस्कृत भाषा येत नसल्यामुळें संस्कृत वचनांचा अर्थ व त्यांचें तात्पर्य हीं त्यांस स्वतः समजत नाहींत; याकरितां त्यांचें भाषांतर देश भाषांत केलें तरच तीं त्यांस समजतात. आणि असल्याप्रकारच्या वादविवादांतलें प्रमेय त्यांस समजण्यास तें भाषांतरच कायतें

साधन. कितीएक उत्तर देणारांस हीच गोष्ट हितावह झाली. त्यांनीं आपापल्या ग्रंथांत घातलेल्या वचनांचे अर्थ ओढून ताणून भलतेच केले, आणि संस्कृत ज्यांस येत नाहीं अशा वाचणाऱ्यांस तेच त्यांचे अर्थ वास्तविकसे वाटले. तरी हा दोष वाचणाऱ्यांचा नाहीं. कारण, धर्मसंबंधी वादविवादांत पडलेले लोक धौर्त्य व लबाडी करून ऋषिवाक्यांचा भलताच अर्थ करतील व तो बिनदिकत छापून लोकांत प्रसिद्ध करतील असें सहसा कोणास वाटत नाहीं.

कितीएक उत्तर देणारांस उगीच उपहास व शिवीगाळ करण्यांतच संतोष होतो हीगोष्ट फारच वाईट आहे. धर्मसंबंधी गोष्टींच्या वादविवादामध्यें उपहास व शिवीगाळ हीं मोठीं हत्यारें आहेत, असें मला ठाऊक नव्हतें. या उत्तर देणारांनीं उपहास वगैरे नकरतां त्याविषयाची योग्यता पाहून त्याच्या साधकबाधकांचा विचार करावयाचा होता. या प्रकारचीं उत्तरें देणारांच्या निरनिराळ्या ग्रंथांचा खप त्यांत ज्या ज्या मानानें उपहास व शिव्यागाळी आहेत त्या त्याच मानानें झाला आहे, ही गोष्ट मोठी आश्चर्य करण्यासारखी आहे. पुष्कळ उत्तरदेणारांनीं हा प्रकार केलेला पाहून मला फार वाईट वाटलें. परंतु मग मी एक ग्रंथ वाचला आणि तेव्हांपासून मला वाईट वाटलें होतें तें सर्व गेलें. हा ग्रंथ ह्मणजे वर (नवरा) या सहीनें माझ्या ग्रथास उत्तर होतें. हा उत्तरदेणारा वयोवृद्ध व या देशांत मोठा नामांकित ब्राह्मण असून त्यानें आपल्या ग्रंथांत कितीएक ठिकाणीं फारच हलकटपणा

दाखवला आहे. यावरून माझा असा ग्रह झाला कीं, धर्मसंबंधी गोष्टींच्या वादविवादांत विरुद्धपक्षाच्या मनुष्याविषयीं हलकट भाषेनें लिहिणें ह्मणजे विद्वत्तेचें प्रमाणच होय. कारण, असें नसतें तर हा श्रेष्ठ व वयोवृद्ध मनुष्य ज्यास सर्वलोक उत्तम विद्वान असें ह्मणतात तो अशी गोष्ट कधींच करताना.

अस्तु, कोणत्याही प्रकारचीं उत्तरें असोत. तीं देणारांचे मजवर उपकार आहेत हें कबूल करून मी त्यांचे प्रसिद्धपणें मोठे आभार मानतों. माझ्या ग्रंथास उत्तरें देण्याची तसदी ते न घेते तर असें दिसतें, कीं विद्वान व वजनदार लोकांस माझा ग्रंथ अगदींच तुच्छ व उत्तर देण्यास अयोग्य असा वाटला असावा. परंतु त्यांच्या उत्तरांपासून निदान एवढें स्पष्ट समजतें कीं मी जो विषय धरला आहे तो केवळ धिःकारून सोडून द्यावा असा नाहीं. हे उत्तर देणारे स्तब्धच राहते तर माझा अगदीं मनोभंग झाला असता. विधवाविवाह शास्त्रविरुद्ध आहे हें सिद्ध करण्याकरितां लागू पडण्यासारखीं जेवढीं प्रमाणें व आधार मिळून होते तेवढे सर्व मोठ्या मेहनतीनें शोधून काढून त्यांनीं आपापल्या ग्रंथांत दाखल केले आहेत. आतां, विधवाविवाहास अनेक प्रकारचीं बाधकें दाखविण्याविषयीं निरनिराळ्या लोकांनीं अनेक प्रकारांनीं आपली अगदीं पराकाष्ठा केली आहे. तेव्हां त्यांस विरुद्ध वाटण्यासारखें म्हणून जेवढें होतें तेवढें सर्व संपलें, असें अनुमान करण्यास कांहीं चिंता नाहीं. या सर्व बाधकांचा तारतम्यानें विचार

केला म्हणजे विधवाविवाहाची चाल शास्त्रसंमत आहे किंवा कसें या बदलचे सर्व संशय दूर होतील.

माझ्या विरुद्ध पक्षाच्या लिहिणारांनीं आपल्या ग्रंथांत, प्रकृत विषयास लागू नाहींत अशा गोष्टी बहुत लिहिल्या आहेत. त्या सोडून देऊन मला ज्या लागू दिसल्या त्यांचीं उत्तरें मीं दिलीं आहेत. हीं उत्तरें देण्याविषयीं मी आपणा कडून पुष्कळ परिश्रम केले आहेत; या करितां वाचणारांस माझी अशी प्रार्थना आहे कीं, त्यांनीं हा ग्रंथ निदान एकवार तरी साद्यंत वाचून पाहावा, म्हणजे माझ्या श्रमांचें सार्थक झालें असें मी मानीन.



# अध्याय १ ला.

## पराशराचें वचन प्रत्यक्ष विवाहित स्त्रियांसच लागू आहे केवल वाचादत्त कन्यांस नव्हे.

"पतीचा पत्ता लागेनासा झाला" इत्यादि संकटें आलीं असतां दुसरा पति करण्या विषयींचें जें पराशराचें वचन आहे तें प्रत्यक्ष विवाहित स्त्रियांविषयीं नव्हे, तर तें वाचा दत्त कन्यांविषयीं आहे, असा कोणी प्रतिपक्षी यांनीं निर्णय केला आहे. तेव्हां तो निर्णय रास्त आहे किंवा नाहीं हें पाहणें आवश्यक आहे.

प्रथमतः पराशरसंहितेच्या टीकेंत विवाह, ब्रह्मचर्य व सहगमन यांचीं विधायक पराशराचीं वचनें लिहितांना त्यांस जें अवतरण माधवाचार्यांनें दिलें आहे त्यावरून विवाहा विधायक वचन वाचादत्त कन्यांविषयीं नव्हे हें स्पष्ट आहे. तें असें:—

**परिवेदनपर्य्याधानयोरिव स्त्रीणां पुनरुद्वाहस्यापि प्रसंगात् क्वचिदभ्यनुज्ञां दर्शयति.**

"परिवेदन+ व पर्याधान* यांविषयीं सांगून त्यांज प्रमाणेंच स्त्रियांस पुनर्विवाहाचा ही प्रसंग आहे, तेव्हां कांहीं प्रसंगीं पुनर्विवाह शास्त्रसंमत आहे असें दाखवितो. तें असें:—

---

+ ज्येष्ठ बंधूचा विवाह होण्या पूर्वीं जो कनिष्ठ बंधूचा विवाह त्यास परिवेदन म्हणतात.

* ज्येष्ठ बंधूनें अग्निहोत्र घेण्यापूर्वीं कनिष्ठ बंधूनें अग्निहोत्र घेणें यास पर्याधान म्हणतात.

**नष्टे मृते प्रव्रजिते क्लीबे च पतिते पतौ ।**
**पंचस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते ॥***

**पुनरुद्वाहमकृत्वा ब्रम्हचर्य्यव्रतानुष्ठाने**
**श्रेयोतिशयं दर्शयति ॥**

"पुनर्विंवाह न करितां ब्रह्मचर्यव्रतानें राहिल्यास पुण्य विशेष आहे असें दर्शवितो. तें असें:-

**मृते भर्तरि या नारी ब्रह्मचर्य्ये व्यवस्थिता ।**
**सा मृता लभते स्वर्गं यथा ते ब्रह्मचारिणः ॥***
**ब्रह्मचर्यादप्यधिकं फलं अनुगमने दर्शयति ॥**

"ब्रह्मचर्यव्रतानें राहण्यांत जें पुण्य आहे त्याही पेक्षां सहगमनांत पुण्य विशेष आहे असें दर्शवितो." तें असें:-

**तिस्रः कोटयोऽर्द्धकोटी च यानि लोमानि मानवे ।**
**तावत् कालं वसेत् स्वर्गं भर्तारं यानुगच्छति ॥***

पराशर असें प्रतिपादन करितो कीं, प्रथमतः पुनर्विवाह हा सशास्त्र आहे; दुसरें, ब्रह्मचर्यानें राहणें हें पुनर्विवाहापेक्षां विशेष श्रेयस्कर आहे; आणि तिसरें, सहगमन हें तीन्ही गोष्टीं मध्यें श्रेष्ठ आहे. यावरून असें दिसतें कीं या तीन्ही गोष्टी एकाच स्त्रीस लागू आहेत. तेव्हां विवाहविधि जर वाचा दत्तकन्येविषयीं असेल तर ब्रह्मचर्य व सहगमन हे विधि तिजविषयींच असले पाहिजेत. परंतु कलियुगांत ह्मणजे प्रस्तुतकाळीं ज्या वरास जी कन्या केवळ वाचा दत्त झाली तो वर तिशीं विवाह होण्यापूर्वींच मेला

* यांचे अर्थ ९ व्या पृष्ठांत हीं आलीं आहेत तेथें लिहिले आहेत.

अथवा त्यास पांच आपत्तीं पैकीं दुसरी एखादी आपत्ति आली तर त्या कन्येनें यावज्जीव ब्रह्मचर्य व्रतानें राहावें अथवा तो मेला असतां त्याच्या प्रेताशीं सहगमन करावें असें ह्मणणें हें न्याय्य नव्हे व सयुक्तिक ही नव्हे.

आणखी असाही एक विचार आहे कीं, जर वरील वचन वाचादत्त कन्येविषयीं कशाही रीतीनें लावतां येतें तर, हें विवाहविधायक वचन कलियुगा खेरीज इतर युगांविषयीं आहे असा जो माधवाचार्याचा कटाक्षपूर्वक पुढचा लेख आहे तो त्यानें लिहिला नसता.

**अयंच पुनरुद्वाहो युगांतरविषयः ।**

"ही पराशराची पुनर्विवाहाची आज्ञा कलियुगा खेरीज इतर युगांविषयीं समजली पाहिजे."

माधवाचार्यांच्या व्याख्येवरून आणि ही पुनर्विवाहाची आज्ञा इतर युगांविषयीं आहे, या त्याच्या ह्मणण्या वरून पराशराचें विवाहविधायक वचन वाचादत्त कन्येविषयीं लागू नाहीं यांत अगदीं संशय उरला नाहीं.

नारदसंहिता पाहिली असतां, "पतीचा पत्ता नाहींसा झाला असतां" इत्यादि अर्थाच्या वचनांत सांगितलेलें पुनर्विवाहाचें विधान वाचादत्त कन्येविषयीं सुतरां ह्मणतांच येत नाहीं असें अगदीं स्पष्ट होईल. तें असें:—

**नष्टे मृते प्रव्रजिते क्लीबे च पतिते पतौ ।**
**पंचस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते ॥**
**अष्टौ वर्षाण्यपेक्षेत ब्राह्मणी प्रोषितं पतिम् ।**
**अप्रसूता तु चत्वारि परतोऽन्यंसमाश्रेयत् ।**

क्षत्रिया षट् समास्तिष्ठेदप्रसूता समात्रयम् ।
वैश्याप्रसूता चत्वारि द्वे वर्षेत्वितरा वसेत् ॥
न शूद्रायाः स्मृतः काल एष प्रोषितयोषिताम् ।
जीवति श्रूयमाणे तु स्यादेष द्विगुणो विधिः ।
अप्रवृत्तौ तु भूतानां दृष्टिरेषा प्रजापतेः ॥
अतोऽन्यगमने स्त्रीणामेष दोषो न विद्यते ॥ *

"पतींचा शोध लागेनासा झाला, तो मेला, सन्यस्त झाला, नपुंसक ठरला, किंवा पतित ह्मणजे दुराचारी निघाला तर बायकोनें दुसरा पति करावा असा विधि आहे. प्रवासास गेलेल्या पतीची मार्गप्रतीक्षा ब्राह्मणस्त्रियेनें आठवर्षें पावेतों करावी, आणि मूल झालें नसलें तर चार वर्षें करावी आणि मग तिनें दुसरा पति करावा. क्षात्रयास्त्रियेनें सहा वर्षें वाट पाहावी आणि मूल झालें नसेल तर तीनच वर्षें वाट पाहावी. वैश्यस्त्रियेनें मूल झालें असेल तर चार वर्षें वाट पाहावी आणि नसेल तर दोनच वर्षें पाहावी. शूद्रस्त्रियेनें प्रवासास गेलेल्या पतीची वाट अमुक वर्षें पर्यंत पाहावी अशी कालमर्यादा मुळींच नाहीं. पति जिवंत आहे इतकीच वार्ता कळल्यास पूर्वोक्त कालमर्यादा दुप्पट धरावी असा नियम आहे. जिवंत असल्याची बातमी नसल्यास पूर्वी सांगितलेल्या मर्यादा समजाव्या. याप्रमाणें ब्रह्मदेवाचें मत आहे. यास्तव त्या त्या कालमर्यादे नंतर स्त्रियांनीं दुसरा पति केल्यास दोष नाहीं.

आतां यावरून दिसतें कीं, वरील विवाहविषयक वचन

---

* नारदसंहिता अध्याय १२ वा.

वाचादत्त कन्येविषयीं मुळींच लावतां येत नाहीं. प- रागंदा झालेल्या पतीची वाट बायकांनीं पाहण्याच्या मर्यादा, त्यांस मुलें झालीं असतील अगर नसतील त्या त्या मानानें निरानिराळ्या सांगितल्या आहेत. वाचादत्त कन्येविषयीं हा नियम असता तर तिला मूल झालें असलें अगर नसलें, हें ह्मणणें असंगत होईल. यावरून वरील वचन वाचा दत्त- कन्यांस लागू होत नाहीं हें अगदीं निर्विवाद सिद्ध झालें.

वरील पराशरवचन प्रत्यक्ष विवाहित स्त्रियां विषयीं न योजतां तें वाचादत्त कन्यांविषयीं योजण्याची खटपट कि- तीएक लोक करितात. त्याचें कारण असें:—

विवाहित स्त्रीच्या विवाहाचा निषेध करणारीं कांहीं वच- नें आहेत, तेव्हां पराशराचें वचन विवाहित स्त्रीच्या वि- वाहाचा विधि करणारें असें म्हटलें असतां वचनांचा परस्प- र विरोध येतो. तशींच वाचादत्त कन्यांचा विवाह अन्य- पतींशीं करण्याविषयीं दुसरीं वचनें साधक आहेत, तेव्हां पराशराचें ही वचन त्यांज विषयींच लावलें असतां विरोध येत नाहीं. या करितां पराशराच्या वचनाचा अर्थ वाग्द- त्त कन्यांकडेच लावण्यासाटीं कांहीं लोक भांडतात. परंतु माझें ह्मणणें असें आहे कीं, विवाहित स्त्रीच्या विवाहाचा निषेध करणारीं वचनें आहेत तसेंच वाचादत्त कन्येच्याही विवाहाचा निषेध करणारें वचन काश्यपाचें आहे. तें असें:—

सप्त पौनर्भवाः कन्या वर्ज्जनीयाः कुलाधमाः ।
वाचादत्ता मनोदत्ता कृतकौतुकमंगला ।
उदकस्पर्शिता या च या च पाणिगृहीतिका ।

**अग्निं परिगता या च पुनर्भूप्रभवा च या ।**
**इत्येताः काश्यपेनोक्ता दहंति कुलमाग्निवत् ॥**

"सात प्रकारच्या पुनर्भू कन्या कुलांत अधम आहेत, त्यांज बरोबर लग्न करूं नये. वाचादत्ता, ह्मणजे शब्दानें शपथपूर्वक एखाद्यास दिलेली; मनोदत्ता, ह्मणजे आईबापानीं अथवा रक्षकानें आपल्या मनानेंच दिलेली; कृतकौतुकमंगला, ह्मणजे जिच्या हातांत विवाह संबंधी कंकण बंधन झालें आहे ती; उदकस्पर्शिता, ह्मणजे सुवर्णाभिषेक झालेली; पाणिगृहीतिका, ह्मणजे जिचें पाणिग्रहण झालें आहे ती; अग्निपरिगता, ह्मणजे जिचा विवाहहोम झाला आहे ती; आणि पुनर्भू प्रभवा ह्मणजे पुनर्भू स्त्रीपासून उत्पन्न झालेली; काश्यपानें सांगितलेल्या या सात कन्या वरल्या असतां वरणाराचें कुळ अग्नीप्रमाणें जाळतात.

आतां पाहा, ज्यांशीं विवाह करूंनये अशा कन्यांतच वाचादत्त कन्येचें ग्रहण करून काश्यपानें तीस पुनर्भू म्हणजे दुसऱ्या विवाहाची हें नांव दिलें आहे; यावरून तिच्याही विवाहाचा निषेध आहेच. विवाहित स्त्री व वाचा दत्त स्त्री या उभयतांचा निषेध काश्यपानें सारखाच केला आहे. यास्तव, विवाहित स्त्रीच्या विवाहाचीं निषेधकारक वचनें आहेत म्हणून तिच्या विवाहाच्या विधायक पराशरवचनाचा मीं लिहिलेला अर्थ करूंनये असें जर म्हटलें तर, त्याच न्यायानें वाचादत्त कन्येच्या विवाचा निषेध काश्यपानें केला आहे यास्तव तिच्याही विवाहा विषयीं पराशराचें वचन लावतां येत नाहीं. यावरून पराशर

वचनाची वाचादत्त कन्यांसच लागू पडणारी व्याख्या केली तरी त्याची विवाहविषयक सगळ्या स्मृतींशी एकवाक्यता होत नाहींच. आणि एकवाक्यता करण्याचा हा मार्ग ही नव्हे. एकवाक्यता जरूरच असल्यास पुढें लिहिल्या प्रमाणें करावी:—

विवाहित स्त्रियांच्या विवाहाचा विधि अथवा निषेध करणारीं जीं काश्यपाचीं व इतर ऋषींचीं वचनें त्यांत तो विधि अथवा निषेध अमुक युगांत समजावा असा विशेष उल्लेख केला नाहीं. यावरून ते सर्व युगांस सारखेच लागू आहेत असें मानावें. परंतु प्रकृत विषयावर विधि निषेध बुद्धया कलियुगा करितांच केले असल्यास ते त्या युगाकरितां विशेष नियम ह्मटले पाहिजेत. तर प्रकृत विषयावर केवळ कलियुगा करितां हे विशेष नियम आहेत त्या पक्षीं याविषयींच्या सामान्य नियमांशीं त्यांची एकवाक्यता करणें मुळींच जरूर नाहीं; आणि ती करितां ही येणार नाहीं. कारण, विशेष नियमानें सामन्य नियमाचा बाध होतो, ही गोष्ट सर्वसंमत आहे. आतां कलियुगाविषयींच जेवढे विशेष नियम असतील त्या सर्वांची परस्पराशीं एक वाक्यता झाली पाहिजे हें मात्र जरूर आहे आणि कलियुगांत विधवाविवाह शास्त्रसंमत आहे अथवा शास्त्रविरुद्ध आहे याचा निर्णय होणें हें त्या एक वाक्यतेवरच आहे. ही एकवाक्यता करण्यासाठीं, कलियुगांत स्त्रियांच्या पुनर्विवाहाचीं निषेधक वचनें प्रथमतः लिहितों.

आदिपुराण

**ऊढायाः पुनरुद्वाहं ज्येष्ठांशं गोवधं तथा ।**
**कलौ पंच न कुर्वीत भ्रातृजायां कमंडलुम् ॥***

"विवाहित स्त्रीचा पुनर्विवाह करणें; उत्तम भाग ज्येष्ठ बंधूस देणें; गोवध करणें; भावजईच्या ठायीं पुत्रोत्पत्ति करणें; सन्यास घेणें; हीं पांच कृत्यें कलियुगांत करूं नयेत."

क्रतुसंहिता

**देवराच्च सुतोत्पत्तिर्दत्ता कन्या नदीयते ।**
**न यज्ञे गोवधः कार्य्यः कलौ नच कमंडलुः ॥**

"कलियुगांत भावजईनें धाकट्या दिरापासून पुत्रोत्पत्ति करून घेऊं नये; एक वेळ दिलेली कन्या पुनः देऊं नये; यज्ञकर्मांत गाय मारूं नये; आणि सन्यास घेऊं नये."

बृहन्नारदीयपुराण.

**दत्तायाश्चैव कन्यायाः पुनर्दानं परस्य च ।**

"कलियुगांत दिलेल्या कन्येचें दुसऱ्या वरास पुनः दान करूं नये."

आदित्यपुराण.

**दत्ता कन्या प्रदीयते ।**

"कलियुगांत, एकदा दिलेल्या कन्येचें दान निषिद्ध आहे."

याप्रमाणें आदिपुराण, क्रतुसंहिता, बृहन्नारदीय पुराण, व आदित्यपुराण यांत स्त्रियांच्या पुनर्विवाहाचा सामान्य

---

*पराशरसंहितेच्या व्याख्येंत माधवाचार्यांनें लिहिलें आहे.

शब्दांनीं निषेध केला आहे. परंतु पराशरसंहितेंत पुढें लिहिल्या प्रमाणें आढळतें.

**नष्टे मृते प्रव्राजिते क्लीबे च पतिते पतौ ।**
**पंचस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते ॥***

म्हणजे या पांच आपत्तीं पैकीं कोणती एखादी स्त्रीस आली असतां तिला पुनर्विवाह करण्यास मोकळीक आहे.

याप्रमाणें कलियुगांत स्त्रियांच्या पुनर्विवाहाचीं विधायक व निषेधक अशीं दोन्ही प्रकारचीं वचनें आम्हां पुढें आहेत. या परस्परविरुद्ध दिसणाऱ्या वचनांची एकवाक्यता करणें झाल्यास ती पुढें लिहिल्या प्रमाणें करावी.

वरलिहिलेल्या आदिपुराण वगैरे ग्रंथांतील वचनांत कलियुगांत विवाहित स्त्रीच्या विवाहाचा निषेध सामन्य आहे. पराशरसंहितेंत निरनिराळ्या प्रकारच्या पांच आपत्तींतून कोणती ही आली असतां पुनर्विवाह करावा असा विधि विशेष आहे. जेथें एकाच गोष्टीविषयीं सामान्य व विशेष नियम लागू होत असतात तेथें अशी रीति आहे कीं, विशेष नियम, त्यांत सांगितलेल्या विशेष गोष्टींसच लागू करावे आणि बाकी राहिलेल्या सर्व गोष्टींस सामान्य नियम लागू करावे. यावरून असें सिद्ध होतें कीं, पराशराचा विशेष विधि पांच प्रकारच्या आपत्तींच्या स्थलीं लागू करावा आणि आदिपुराण वगैरेंतील निषेध सर्व सामान्य गोष्टींस लागू करावे. या व्यवस्थेनें परस्परांशीं विरुद्ध दिसणाऱ्या वचनांची एकवाक्यता होऊन विधि व निषेध या दोहोंसही स्थलें मिळतात.

याच विषयाचा आतां विशेष विचार करूं. कात्यायन म्हणतो:—

* याचा अर्थ ९ व्या पृष्ठांत लिहिला आहे तो पाहावा.

**स तु यद्यन्यजातीयः पतितः क्लीब एव च ।**
**विकर्मस्थः सगोत्रो वा दासो दीर्घामयोऽपिवा ॥**
**ऊढापि देया सान्यस्मै सहाभरणभूषणा* ॥**

"विवाह झाल्या नंतर, पति दुसऱ्या जातीचा, पतित, नपुंसक, बरें वाईट न पाहतां पाहिजे तें करणारा, एकाच गोत्राचा, दास ह्मणजे गुलाम, अथवा सदारोगी असा आहे असें आढळल्यास (त्याजबरोबर) लग्न लावलेली स्त्री वस्त्र व अलंकार यांनीं युक्त अशी दुसऱ्या नवऱ्यास द्यावी."

वसिष्ठ ह्मणतो—

**कुलशीलविहीनस्य षंढादिपतितस्य च ।**
**अपस्मारिविधर्मस्य रोगिणां वेषधारिणाम् ॥**
**दत्तामपि हरेत् कन्यां सगोत्रोढां तथैव च ॥+**

"ज्याचें कुल व आचरण नीच आहे, जो नपुंसक पतित, फेंपरें येणारा, बरें वाईट न पाहतां पाहिजे तें करणारा, रोगी, वेषधारी ह्मणजे नट, अथवा एकाच गोत्राचा असा आहे त्या वरास दिलेली कन्या परत घ्यावी." ह्मणजे घेऊन अर्थात दुसऱ्या वरास द्यावी.

नारद म्हणतो—

**नष्टे मृते प्रव्राजिते क्लीबे च पतिते पतौ ।**
**पंचस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते* ॥**

याप्रमाणें कात्यायन, वासिष्ठ आणि नारद यांनीं कोणत्याच

---

*पराशरभाष्य व निर्णयसिंधु या ग्रंथांत हा उतारा आहे.

+ हें वचन उद्वाहतत्वांत घेतलेलें आहे.

* याचा अर्थ ९ व्या पृष्ठांत लिहिला आहे तो पाहावा.

युगाचा विशेष उल्लेख न करतां पति अविचारी, पतित, नपुंसक, रोगी, अपस्मारी, नीचकुळांतला, नीचस्वभावाचा, दास, एकगोत्री, भिन्नजातीचा, असा निघाला, अथवा सन्यस्त झाला, नाहींसा झाला किंवा मेला, तर त्याशीं विवाहित स्त्रीचा पुर्नविवाह करावा असा सामान्य विधि केला आहे.

आदिपुराण.

**ऊढायाः पुनरुद्वाहं ज्येष्ठांशं गोवधं तथा ।**
**कलौ पंच न कुर्वीत भ्रातृजायां कमंडलुम् *॥**

क्रतुसंहिता.

**देवराच्च सुतोत्पत्तिर्दत्ता कन्या न दीयते ।**
**न यज्ञे गोवधः कार्य्यः कलौ नच कमंडलुः* ॥**

बृहन्नारदीयपुराण.

**दत्तायाश्चैव कन्यायाः पुनर्दानं परस्य च* ।**

आदित्यपुराण.

**दत्ता कन्या प्रदीयते* ॥**

परंतु पराशरसंहिता.

**नष्टे मृते प्रव्राजिते क्लीबे च पतिते पतौ ।**
**पंचस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते† ॥**

याप्रमाणें आदिपुराण वगैरे ग्रंथ विवाहित स्त्रीच्या पुनर्विवाहाचा कलियुगांत सामान्यतः निषेध करतात. आणि पराशर विशेष प्रकारच्या पांच आपत्ति सांगून त्यांतली एखादी आली असतां कलियुगांत त्याच विवाहाचें विशेष विधान करतो.

---

* या सर्वांचे अर्थ ३५ व्या पृष्ठावर लिहिलेले आहेत ते पाहावे.

† याचा अर्थ ९ व्या पृष्ठावर लिहिला आहे तो पाहावा.

तर आतां पाहा, कात्यायनादि कांहीं ऋषींनीं विशेष युगाचा उल्लेख न करितां किती एक प्रसंगीं विवाहित स्त्रीच्या पुनर्विवाहाचा विधि केला आहे. हाच विधि सर्व युगांस सारखा उपयोगी पडता; परंतु आदिपुराणादि ग्रंथांत कलियुगांत त्या विवाहाचा निषेध केला आहे तेव्हां त्या युगा विषयीं विशेष निषेध झाला, ह्मणून कात्यायनादि ऋषींचा विधि कलियुगा खेरीज इतर तीन युगांस लागू होतो.

पुनः आदिपुराणादि ग्रंथांत कांहीं प्रसंगांचा विशेष उल्लेख न करितां सामान्यतः कलियुगांत स्त्रियांच्या पुनर्विवाहाचा निषेध केला आहे; परंतु पराशरानें कांहीं विशेष प्रसंग सांगितले आहेत आणि त्या प्रसंगीं कलियुगांत पुनर्विवाह करणें सशास्त्र आहे असें सांगितलें आहे. यावरून पराशराचा विधि तितक्याप्रसंगांस विशेष आहे; आणि आदिपुराणादि ग्रंथांतील निषेध पराशरानें सांगितल्या शिवाय जे प्रसंग राहिले त्या सर्वांस लागू आहेत.

सामान्य आणि विशेष विधि अथवा निषेध एकाच स्थळीं प्राप्त झाले असतां त्यांची व्यवस्था करण्याची नेहमींची रीति हीच आहे. पाहा:—

**अहरहः सन्ध्यामुपासीत ।**

"प्रत्यहीं संध्या करावी."

संध्या करण्याविषयीं वेदांत हा साधारण नियम लिहिला आहे. परंतु,

**संध्यां पंच महायज्ञान् नैत्यकं स्मृतिकर्म च ।**
**तन्मध्ये हापयेत्तेषां दशाहान्ते पुनः क्रिया ॥***

* हें जाबालिवचन शुद्धितत्वांत आहे.

" संध्या, पंच महायज्ञ, आणि स्मृतींत सांगितलेलीं नित्य कर्मे हीं अशौच म्हणजे सुतक व सुयेर यांमध्यें करूं नये. अशौच संपल्या नंतर तीं पुनः करावीं."

येथें अशौचकालामध्यें जाबालि संध्या करण्याचा निषेध करतो. आतां पाहा, संध्या प्रत्यहीं करण्याविषयीं वेदांत सामान्य विधि आहे तरी जाबालीच्या विशेष निषेधास्तव ती अशौचाच्या दिवसांत करीत नाहींत. पुनः,

मनुस्मृति.

**पूर्व्वां सन्ध्यां जपंस्तिष्ठेत् सावित्रीमार्कदर्शनात्।**
**पश्चिमान्तु समासीनः सम्यगृक्षविभावनात्॥**
**न तिष्ठति तु यः पूर्व्वां नोपास्ते यश्च पश्चिमाम्।**
**स शूद्रवद्बहिष्कार्यः सर्वस्माद्द्विजकर्मणः॥**

"प्रातःसंध्येंत सूर्य दृष्टीसपडे पर्यंत द्विजानें उभ्यानें गायत्रीचा जप करीत असावें, आणि सायंसंध्येंत स्वच्छ नक्षत्र दर्शन होई पर्यंत बसून तिचा जप करीत असावें. आणि जो प्रातःसंध्येंत जप करीत उभा राहात नाहीं व सायंसंध्येंत जप करीत बसत नाहीं त्यास, द्विजांस विहित जें कर्म त्या पासून शूद्राप्रमाणें बहिष्कृत करावें." परंतु,

**संक्रान्त्यां पक्षयोरन्ते द्वादश्यां श्राद्धवासरे।**
**सायं सन्ध्यां न कुर्व्वीत कृते च पितृहा भवेत्*॥**

"संक्रांत, पौर्णिमा, अमावास्या, द्वादशी आणि श्राद्धतिथि इतक्या दिवशीं संध्याकाळीं संध्या करूंनये; केली असतां पितृहत्या केल्याचें पातक लागतें."

---

* हें व्यासवचन तिथितत्वांत उतरून घेतलें आहे.

34537

आतां पाहा, (प्रत्यहीं) प्रातःकाळीं आणि सायंकाळीं संध्या करावी असा सामान्य विधि व न केली असतां प्रत्यवाय हे मनुस्मृतींत सांगितले आहेत, तरी व्यासोक्त विशेष निषेधा वरून कितीएक दिवशीं सामान्य विधीचा बाध करून संध्या करीत नाहींत. आणि सामान्य विधीप्रमाणें, व्यासानें सांगितलेल्या विशेष दिवसां खेरीज इतर दिवशीं संध्या कारितात. पुनः वेदांत एके ठिकाणीं,

**मा हिंस्यात् सर्व्वाभूतानि ।**

"प्राणी मारूंनयेत," अशी एक सामान्य आज्ञा आहे. परंतु दुसऱ्या ठिकाणीं पुढें लिहिल्या प्रमाणें आज्ञा आहेत.

**अश्वमेधेन यजेत ।**

"घोडा मारून त्याच्या मांसानें यज्ञ करावा."

**पशुना रुद्रं यजेत ।**

"पशु मारून त्याच्या मांसानें रुद्रयाग करावा."

**अग्नीषोमीयं पशुमालभेत ।**

'अग्नि व सोम यांच्या उद्देशानें यज्ञ करावयाचा तो पशु मारून त्याच्या मांसानें, करावा."

**वायव्यं श्वेतमालभेत ।**

"वायूच्या उदेशानें यज्ञ करावयाचा तो पांढरा बोकड मारून त्याच्या मांसानें करावा."

आतां पाहा, वेदामध्यें एका ठिकाणीं प्राणी मारूं नयेत असा सामान्यतः स्पष्ट निषेध असतां, वेदामध्येंच दुसऱ्या ठिकाणीं अमुक यज्ञांत अमुक पशु मारावे असे विशेष विधि असल्यावरून ते मारणें हें कृत्य पुण्यप्रद आहे असें मानलें

आहे. म्हणजे त्या विशेष विधीवरून पशुहिंसेचा सामान्य निषेध, वेदविहित अश्वमेधादि यागांत सांगितलेली पशुहिंसा सोडून, बाकी राहिलेल्या सर्व स्थळीं लागू करावा. याच विषयावर मनूचें मत पुढें लिहिल्या प्रमाणें आहेः—

**मधुपर्के च यज्ञेच पितृदैवतकर्मणि ।**
**अत्रैव पशवो हिंस्या नान्यत्रेत्यब्रवीन्मनुः ॥**

"मधुपर्क, यज्ञ, व श्राद्ध या कर्मांमध्यें मात्र पशूंचा वध करावा, अन्यत्र करूं नये असें मनूचें वचन आहे."

यावरून असा विचार करावा कीं, वर सांगितलेल्या गोष्टींत सामान्य नियम एक प्रकारचे असून विशेष नियम तद्विरुद्ध असले तरी आपण विशेष नियमांप्रमाणें चालतों. आणि विशेष नियमांत ज्यांचा संग्रह नाहीं अशा स्थळीं सामान्य नियम लागू करितों. यास्तव कलियुगांत स्त्रियांच्या पुनर्विवाहाचा सामान्य निषेध आहे तरी पांच प्रकारच्या आपत्तींमध्यें पराशरानें पुनर्विवाहाचा विशेष विधि केला आहे त्याचें अनुसरण केलें पाहिजे. आदिपुराण वगैरे ग्रंथांतील सामान्य निषेधास पांच आपत्ति सोडून बाकीच्या ठिकाणीं चारितार्थ्य आहेच. पुनर्विवाहप्रकरणीं परस्पर विरुद्ध दिसणाऱ्या वचनांची एक वाक्यता करण्याविषयीं सरळ व सयुक्तिक असा हाच मार्ग आहे असें मला दिसतें.

# अध्याय २.

## पराशराचें पुनर्विवाहविषयक वचन कलियुगासच लागू आहे दुसऱ्या युगास नाहीं.

स्त्रियांच्या पुनर्विवाहवियषक पराशराच्या वचनाची व्याख्या करून नंतर माधवाचार्य असा सिद्धांत करितो कीं;

**अयंच पुनरुद्वाहो युगान्तरविषयः+। तथाचादिपुराणम्**

**ऊढायाः पुनरुद्वाहं ज्येष्ठांशं गोवधं तथा।**

**कलौ पंच न कुर्वीत भ्रातृजायां कमंडलुम्*॥**

माधवाचार्याचें हें म्हणणें रास्त व सयुक्तिक आहे किंवा कसें याचा विचार केला पाहिजे यास्तव अगोदर पराशराचा उद्देश कोणता आहे याचा त्याच्या संहितेच्या आशयावरून व तिजवरील स्वतः माधवाचार्याच्या व्याख्येवरून निर्णय केला पाहिजे.

पराशरसंहिता.

**अथातो हिमशैलाग्रे देवदारुवनालये।**

**व्यासमेकाग्रमासीनमपृच्छन्नृषयः पुरा॥**

**मानुषाणां हितं धर्मं वर्तमाने कलौ युगे।**

**शौचाचारं यथावच्च वद सत्यवतीसुत॥**

"'**यास्तव**' पुरातन काळीं व्यास हिमालयाच्या अग्रावर देवदार वृक्षांच्या वनामध्यें एकाग्र चित्त करून बसला असतां त्यास ऋषींनीं '**त्यानंतर**' विनंती केली कीं, हे सत्यवती

---

+अर्थ ३० व्या पृष्ठावर ही पंक्ति आहे तेथें पाहावा.

*अर्थ ३५ व्या पृष्ठांत हें वचन आहे तेथें पाहावा.

सुता, कलियुगांत मनुष्यांस हितावह असे धर्म ( कर्त्तव्यकर्में ) व आचार (संप्रदाय) कोणते ते आम्हास सांग"

माधवाचार्यांची व्याख्या.

**वर्त्तमाने कलाविति विशेषणात्**
**युगान्तरधर्मज्ञानानन्तर्य्यम् ।**

"'त्यानंतर' म्हणजे, सत्य, त्रेता आणि द्वापार या युगांच धर्म ऋषींस सांगितल्या नंतर" त्यांनीं कलियुगांतील धर्म सांगण्याविषयीं व्यासास विनंती केली.

**अतः शब्दोहेत्वर्थः यस्मादेकदेशाध्यायिनो**
**नाशेषधर्मज्ञानं यस्माच्च युगान्तरधर्ममवगत्य**
**न कलिधर्मावगतिस्तस्मादिति ।**

" 'यास्तव' म्हणजे एका भागाचें अध्ययन करणाऱ्यास संपूर्ण धर्माचें ज्ञान होत नाहीं आणि दुसऱ्या युगांतल्या धर्मांचें ज्ञान झालें तरी त्यापासून कलियुगांतल्या धर्मांचें ज्ञान होत नाहीं, यास्तव" ऋषींनीं विनंती केली.

यावरून असें स्पष्ट दिसतें कीं, कलियुगाच्या आरंभीं ऋषींस सत्य, त्रेता व द्वापार या युगांचे धर्म माहीत होते आणि कलियुगाचे धर्म आपणास समजावे अशी त्यांस इच्छा झाली आणि ते सांगण्या करितां व्यासाकडे जाऊन त्यांनीं विनंती केली.

पराशरसंहिता.

**तच्छ्रुत्वा ऋषिवाक्यन्तु सशिष्योऽग्न्यर्कसन्निभः**
**प्रत्युवाच महातेजाः श्रुतिस्मृतिविशारदः ॥**

**नचाहं सर्वतत्त्वज्ञः कथं धर्मंवदाम्यहम् ॥**

**अस्मत्पितैव प्रष्टव्य इति व्यासः सुतोऽवदत् ॥**

"ऋषींचें तें वाक्य ऐकून, ज्याच्या आसपास शिष्य बसले आहेत, जो अग्नि व सूर्य यांजप्रमाणें महातेजस्वी आणि जो श्रुति व स्मृति यांत निष्णात असा तो ( व्यास ) म्हणाला' **मी सर्व गोष्टींचें तत्व जाणत नाहीं.** मी (कलि) धर्म कसा सांगूं? **माझ्या पित्यासच या विषयीं विचारलें पाहिजे.'** असें पराशराचा पुत्र व्यास बोलला.

माधवाचार्यांची व्याख्या.

**नचाहमिति वदतो व्यासस्यायमाशयः। सम्प्रति कलि धर्माः पृच्छन्ते तत्र न तावदहं स्वतः कलिधर्मतत्त्वं जानामि अस्मत् पितुरेव तत्र प्राविण्यात् अतएव कलौ पाराशराः स्मृता इतिवक्ष्यते । यदि पितृप्रसादान्मम तदभिज्ञानं तर्हि सएव पिता प्रष्टव्यः। नहि मूलवक्तरि विद्यमाने प्रणालिका युज्यत इति ।**

"'**मी सर्व गोष्टींचें तत्व जाणत नाहीं**' असें म्हणणाऱ्या व्यासाचा आशय असा कीं, तुम्ही मला कलिधर्म विचारतां; परंतु मी स्वतः कलिधर्मांचें तत्व जाणत नाहीं. माझा पिताच त्यांत पारंगत आहे. ( या करितांच, पराशर स्मृतींत सांगितलेले धर्म कलियुगांत आचरावे, असें पुढें सांगावयाचें आहे. ) आणि ज्या अर्थीं त्यांचें ज्ञान मला पित्याच्याच प्रसादानें झालें आहे त्या अर्थीं त्यांज विषयीं त्या पित्यासच विचारावें. विषयाचा मूळचा वक्ता जीवंत असतां दुसऱ्या शिकणारापासून तो समजून घेणें हें रास्त नाहीं."

एवकारेणान्यस्मर्त्तारो व्यावर्त्यन्ते । यद्यपि मन्वादयः कलिधर्माभिज्ञास्तथापि पराशरस्यास्मिन् विषये तपोविशेष बलात् असाधारणः कश्चिदतिशयो द्रष्टव्यः । यथा काण्व माध्यन्दिन काठक कौथुम तैत्तिरीयादिशाखासु काण्वादीनामसाधारणत्वंतद्वदत्रावगन्तव्यम् । कलिधर्म सम्प्रदायेपितस्यापि पराशरसुतस्य यदा तद्धर्मरहस्याभि वदने सकोचः तदा किमु वक्तव्यमन्येषामिति ।

" 'माझ्या पित्यासच याविषयीं विचारलें पाहिजे,'

या ह्मणण्यावरून दुसरे स्मृतिकर्ते अगदीं सोडून द्यावयाचे ( ह्मणजे त्यांस याविषयीं विचारून फळ नाहीं ) असा अभिप्राय मनु व दुसरे स्मृतिकर्ते कलिधर्म जाणणारे आहेत तरी कांहीं विशेष तपाच्या प्रभावानें कलिधर्मांविषयीं पराशरच प्रमुख आहे, असें समजलें पाहिजे. जसें काण्व, माध्यंदिन, काठक, कौथुम, तैत्तिरीय इत्यादि शाखांमध्यें काण्व व दुसऱ्या कांहीं एकांसच प्राधान्य आहे, तसेंच कलिधर्मांविषयीं दुसऱ्या सर्व स्मृतिकर्त्यांमध्यें पराशरासच मुख्यत्व आहे असें जाणावें. कलियुगांतले धर्म व आचार सांगण्याविषयीं समर्थत्वें करून अभिमत जो पराशराचा सुत व्यास तोच जर पराशर जीवंत असतां कलिधर्मांचें तत्व सांगण्यास संकोच करतो तर दुसऱ्या ऋषींविषयीं काय सांगावें.?"

यावरून दिसतें कीं, कलिधर्मांविषयीं मनु व दुसरे स्मृतिकर्ते यांमध्यें पराशर मुख्य आणि कलिधर्मांविषयीं त्याचीच स्मृति मुख्य.

पराशर संहिता.

**यदि जानासि मे भक्तिं स्नेहाद्वा भक्तवत्सल ।**
**धर्मं कथय मेतात अनुग्राह्योह्यहं तव ॥**

"हे ताता, तुला भक्ताविषयीं प्रेम आहे. तूं जर माझी भक्ति जाणत असशील आणि मजवर तुझी माया असेल तर तूं मला धर्म सांग. मी तुझ्या प्रसादास पात्र आहें." अशी व्यासानें पित्यास विनंती केली.

माधवाचार्यांची व्याख्या.

**ननु सन्ति बहवो मन्वादिभिः प्रोक्ता धर्माः तत्र को धर्मो भवता बुभुत्सित इत्याशंक्य बुभुत्सितं परिशेष यितुमुपन्यस्यति ॥**

"मनु व दुसरे स्मृतिकर्ते यांनीं सांगितलेले बहुत धर्म प्रसिद्ध आहेत, त्यांतला कोणता धर्म जाणण्याची तुझी इच्छा आहे असें कदाचित् पराशर विचारील अशी व्यासाच्या मनांत आशंका येऊन ज्या ज्या धर्माचें अध्ययन त्यानें पूर्वींच केलें होतें त्या सर्वांचा उल्लेख करून जो धर्म जाणण्याची प्रस्तुत इच्छा आहे तो शेवटीं सांगावा अशा अभिप्रायानें उपक्रम करितो."

पराशरसंहिता.

**श्रुता मे मानवा धर्मा वासिष्ठाः काश्यपास्तथा ।**
**गार्गेया गौतमाश्चैव तथाचौशनसाः स्मृताः ॥**
**अत्रेर्विष्णोश्च सांवर्ता दाक्षा आङ्गिरसास्तथा ।**
**शातातपाश्च हारीता याज्ञवल्क्यास्तथैवच ॥**
**आपस्तम्बकृता धर्माः शङ्खस्य लिखितस्यच ॥**

**कात्यायनकृताश्चैव प्राचेतसकृताश्चये ।**

**श्रुता ह्येतेभवत्प्रोक्ताः श्रुतार्थास्ते न विस्मृताः**

**अस्मिन् मन्वन्तरे धर्माः कृतत्रेतादिके युगे ॥**

"मनु, वसिष्ठ, कश्यप, गर्ग, गोतम, उशना, आत्रि विष्णु, संवर्त्त, दक्ष, अंगिरा, शातातप, हारित, याज्ञवल्क्य, आपस्तंब, शंख, लिखित, कात्यायन आणि प्रचेता यांनीं सांगितलेले धर्म तुज पासून मीं ऐकले आहेत व ते सार्थ ऐकलेले धर्म मी विसरलों नाहीं. ते धर्म सत्य, त्रेता आणि द्वापार या युगांतले होत."

माधवाचार्यांची व्याख्या.

**इदानीं परिशिष्टं बुभुत्सितं पृच्छति ।**

"जे धर्म त्यास समजून घ्यावयाचे त्यांविषयीं पुसतो."

पराशरसंहिता.

**सर्व्वे धर्माः कृते जाताः सर्व्वे नष्टाः कलौयुगे ।**

**चातुर्वर्ण्यसमाचारं किंचित् साधारणंवद ॥**

"सत्ययुगांत सर्व धर्म उत्पन्न झाले आणि कलियुगांत ते सर्व नष्ट झाले. या करितां चारीवर्णांचे ( ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांचे ) साधारण असे कांहीं धर्म सांग."

माधवाचार्यांची व्याख्या.

**विष्णुपुराणे,**

**वर्णाश्रमाचारवती प्रवृत्ति र्न कलौ नृणाम् ।**

**आदिपुराणेऽपि,**

**यस्तु कार्त्तयुगे धर्मो न कर्त्तव्यः कलौयुगे ।**

**पापप्रसक्तास्तु यतः कलौनार्य्यो नरास्तथा ॥**

**अतः कलौ प्राणिनां प्रयाससाध्ये धर्मे प्रवृत्त्यसम्भवात् सुकरो धर्मोऽत्र बुभुत्सितः ।**

"विष्णुपुराणांत असें सांगितलें आहे कीं, 'चारी वर्णांचे व चारी आश्रमांचे ( ब्रम्हचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ आणि सन्यास, या आश्रमांचे ) विशेष धर्म यांचें आचरण करण्याविषयीं कलियुगांत मनुष्यांची प्रवृत्ति नाहीं. आदिपुराणांतही असें सांगितलें आहे कीं, 'कृतयुगांतल्या धर्मांचें आचरण कलियुगांत होत नाहीं. कारण ( कलींत ) स्त्रिया व पुरुष यांची प्रवृत्ति पापाकडे फार आहे.' जे धर्म आचरण्यास कठिण ते आचरण्याविषयीं कलियुगांत मनुष्यांची प्रवृत्ति होण्याचा असंभव आहे; यास्तव सुखानें आचरण्या सारखे धर्म कोणते ते जाणण्याची व्यासाची इच्छा होय."

या सर्व गोष्टींवरून, मन्वादिकांनीं सांगितलेले धर्म सत्य, त्रेता आणि द्वापार या युगांसच लागू आहेत आणि त्या सर्वांचें आचरण कलियुगांत होणें असंभाव्य आहे हें अगदीं उघड आहे. याच हेतूस्तव व्यास, पराशरास, कलियुगांत ज्यांचें आचरण सहज करितां येईल असे धर्म सांगण्याविषयीं, विनंती करितो.

पराशरसंहिता.

**व्यासवाक्यावसानेतु मुनिमुख्यः पराशरः ।**
**धर्मस्य निर्णयं प्राह सूक्ष्मं स्थूलंच विस्तरात् ॥**

"व्यासाचें भाषण संपल्यावर मुनींमध्यें श्रेष्ठ पराशर, हा धर्मांतील साधारण तत्वें व बारिक गोष्टी यांचा निर्णय विस्तारानें सांगूं लागला."

या वरून असें दिसतें कीं, आपला प्रिय पुत्र व्यास याच्या विनंतीवरून पराशर कलियुगांतले धर्म त्यास सांगूं लागला.

आतां आमच्या वाचणाऱ्यांनीं विचार करावा कीं, वर लिहिलेलीं पराशराचीं मूळवचनें व त्यांजवरची खुद्द माधवाचार्यांची व्याख्या यांजवरून, कलियुगांत धर्मांचा निर्णय सांगणें हाच एक पराशरसंहितेचा उद्देश आहे असें अगदीं निःसंशय सिद्ध होतें किंवा नाहीं. आणि या संहितेचा हाच उद्देश आहे असें समजलें म्हणजे तो साद्यंत ग्रंथ केवळ कलियुगाविषयींच आहे हें अवश्य कबूल केलेंच पाहिजे. तेव्हां विधवा व दुसऱ्या स्त्रिया यांच्या विवाहाविषयींचें वचन दुसऱ्या युगांविषयीं अशी कल्पना करणें अगदींच असंगत आहे. कलियुगाच्या प्रारंभीं व्यास व दुसरे ऋषि यांनीं आम्ही पूर्वींच्या युगांतल्या धर्मांचें ज्ञान संपादिलें आहे असें स्पष्ट सांगून आम्हांस कलियुगांतल्या धर्मांचा उपदेश करा अशी पराशरास प्रार्थना केली; त्यावरून पराशर आपल्या सर्व ग्रंथांत त्याच युगाचे धर्म सांगत असतां मध्यें एकच वचन युगांतरच्या धर्मांविषयीं सांगेल ही कल्पना करणें तिळमात्र तरी सयुक्तिक दिसतें काय? यावरून पराशरानें स्त्रियांच्या पुनर्विवाहाचा विधि केला तो केवळ कलियुगांतलाच धर्म आहे या विषयीं अगदीं संशयाचा लेशही नाहीं.

पराशर संहितेचा उद्देश कलिधर्मांचा निर्णय सांगावयाचा हाच आहे असा माधवाचार्यानें आपल्या व्याख्येंत

सिद्धांत केला आहे हें वर दाखविलेंच आहे. यास्तव त्या संहितेच्या उद्देशास उलटा व स्वतांच्या व्याख्यानासही विरुद्ध असा दुसरा एखादा सिद्धांत त्या व्याख्याकारानें काढल्यास तो सयुक्तिक आहे असें कोणीही मानणार नाहीं.

विवाह, ब्रह्मचर्य व सहगमन या विषयींच्या पराशर वचनांवरील पुढें लिहिलेल्या अभिप्रायाची माधवाचार्यांची व्याख्या, विवाहविषयकवचन कलियुगाखेरीज इतर युगांविषयीं लागू असें ह्मटल्यास, असंबद्ध होईलः—

"कांहीं एक आपत्तींत स्त्रियांस पुनर्विवाह करणें विहित ह्मणजे सशास्त्र आहे."

"पुनर्विवाह करण्यापेक्षां ब्रह्मचर्यानें राहणें स्त्रियांस अधिक श्रेयस्कर आहे."

"ब्रह्मचर्यानें राहण्यापेक्षांही सहगमन करणें हें अधिकश्रेयस्कर आहे."

माधवाचार्यांच्या मतीं पुनर्विवाह पूर्वींच्या युगांविषयीं सांगितला आहे, आणि ब्रह्मचर्य व सहगमन हीं कलियुगाविषयीं सांगितलीं आहेत. तेव्हां पुनर्विवाहाचें विधायक आणि ब्रह्मचर्य व सहगमन यांचीं विधायक या वचनांचा परस्परांशीं संबंधच राहिला नाहीं. आतां पुनर्विवाह विषयक वचन पूर्वींच्या युगांविषयींच आहे असा माधवाचार्यानें सिद्धांत केला त्यावरून कलियुगांतील विधवांस पुनर्विवाहाचा अधिकारच नाहीं; तेव्हां आतां कलियुगांतील विधवांस उद्देशून पुनर्विवाह करण्यापेक्षां ब्रह्मचर्यानें राहणें स्त्रियांस अधिक श्रेयस्कर आहे, असें जें तुलनें करून अधिक

श्रेय सांगितलें तें अगदीं असंगत झालें. प्रथम, स्त्रियांचा पुनर्विवाह करणें वैध आहे; दुसरें, पुनर्विवाह करण्यापेक्षां ब्रह्मचर्यानें राहणें अधिक श्रेयस्कर आहे; आणि तिसरें, सहगमन करणें हें त्याहूनही अधिक श्रेयस्कर आहे; अशा अर्थाच्या तीन वचनांचा परस्परांशीं जो अगदीं उघड संबंध दिसत आहे त्यावरून असाच सिद्धांत होतो कीं, तीं तिन्हीं वचनें एकाच युगाविषयीं आहेत. तेव्हां पुनर्विवाह जर मागच्या युगांविषयीं असें ह्मटलें तर ब्रह्मचर्य व सहगमन हींही त्याच युगांविषयीं अर्थात ह्मटलीं पाहिजेत. आणि ब्रह्मचर्य व सहगमन कलियुगाविषयीं आहेत असें ह्मटलें तर पुनर्विवाहही कलियुगाविषयींच आहे असें ह्मटलें पाहिजे. त्या वचनांचा परस्परांशीं संबंध नाहींसा झाला असतां त्यांच्या अर्थांतील मुख्य स्वारस्यच जाईल. तात्पर्य; विधवाविवाह हा पूर्वींच्या युगांतला धर्म आहे हें स्थापन करण्याच्या भरांत माधवाचार्यानें केवळ संहिता करणाऱ्या पराशराच्या अभिप्रायासच विरुद्ध व्याख्यान केलें असें नाहीं तर त्यानें आपल्या स्वतांच्या व्याख्यानासही विरुद्ध व्याख्यान केलें, हें मागील लेखांवरून सर्वांस कबूल केलें पाहिजे.

'जे धर्म आचरण्यास कठिण त्यांजविषयीं कलियुगांतल्या लोकांची प्रवृत्ति होण्याचा संभव नाहीं, यास्तव पराशरसंहितेचा उद्देश असा आहे कीं कलियुगाकरितां सुखानें आचरण्यासारखे सोपे धर्म सांगावे' असें स्वतः माधवाचार्यांनेंच सांगितलें आहे. त्याप्रमाणें, पुनर्विवाह हा सोपा धर्म ह्मणून

सर्व विधवांस प्रथमच तो सांगितला. ब्रह्मचर्यानें राहणें कठिण आहे, सबब ज्यांस तसें राहण्याविषयीं आपल्या मनाची तितकी दृढता वाटत असेल त्यानीं तसें राहावें व तसें राहण्याबद्दल त्यांस स्वर्ग सुखाची प्राप्ति होईल असा दुसरा पक्ष सांगितला. सहगमन हें फारच अवघड तेव्हां तें करण्यासारखें धारिष्ट ज्या स्त्रियांच्या अंगीं असेल त्यांनींच तें करावें व तें करण्याबद्दल स्त्रियांस अनंतकाल पावेतों स्वर्गवासाची प्राप्ति होईल असा तिसरा पक्ष सांगितला. असें असतां सर्वांत सोपा धर्म जो पुनर्विवाह तो माधवाचार्यानें मागील युगांविषयीं म्हणून सांगितलें आणि फारच अवघड असे जे ( ब्रह्मचर्य व सहगमन हे ) दोन धर्म ते कलियुगाविषयीं म्हणून सांगितले. आतां, अवघड धर्म आचरण्याविषयीं कलियुगांत मनुष्यांची प्रवृत्ति होणार नाहीं म्हणून पराशराचा उद्देश कलियुगाकरितां अगदीं सोपे धर्म सांगण्याचा आहे, अशी माधवाचार्यानें पूर्वीं जी व्याख्या केली आहे तीस त्याचीच ही पुनर्विवाह, ब्रह्मचर्य व सहगमन याविषयींची व्यवस्था जमते किंवा कसें याचा विचार वाचणाऱ्यांनींच करावा. मागील युगांतलीं मनुष्यें अत्यंत दृढ निश्चयाचीं असून त्यांस जो अतिशय सोपा धर्म करण्याची मोकळीक होती तोच करण्याची मनाई कलियुगांतल्या अशक्त व चंचल निश्चयाच्या मनुष्यांस असावी ही कल्पना फारच चमत्कारिक आहे. वस्तुतः कलियुगांतले लोक पूर्वींच्या युगांतल्या आपल्या पूर्वजांपेक्षां शरीरानें व मनानें फारच अशक्त झाले आहेत त्यामुळें अवघड धर्म आच-

रण्याविषयीं त्यांस सामर्थ्य नाहीं; आणि पराशरानें कलिधर्म सांगण्यास आरंभ करून सामान्यतः सर्व विधवांविषयीं सर्वांत सोपा जो पुनर्विवाहरूपधर्म तोच प्रथम सांगितला आहे, या गोष्टीचा विचार केला असतां असाच सिद्धांत होतो, कीं पुनर्विवाहाचा विधि कलियुगांतल्या विधवांविषयीं योजिलेला नव्हे ही माधवाचार्यांची कल्पना युक्तींशीं व संहिताकर्त्यांच्या मूळ उद्देशाशीं अगदींच जमत नाहीं, यास्तव ती खोटी होय.

मागें लिहिलेली माधवाचार्यांची व्याख्या पराशराच्या मूल अभिप्रायास विरुद्ध आहे हें पुढें भट्टोजी दीक्षिताचें मत लिहिलें आहे त्यावरूनही स्पष्ट होतें:—

**नच कलिनिषिद्धस्यापि युगान्तरीयधर्मस्यैव नष्टेमृते इत्यादिपराशरवाक्यं प्रतिपादकमिति वाच्यं । कलावनुष्ठेयान् धर्मानेव वक्ष्यामीति प्रतिज्ञाय तत्ग्रन्थप्रणयनात् ।***

"कलियुगांत ज्याचा निषेध केला आहे अशा विवाहाचा विधि कलियुगा खेरीज दुसऱ्या युगांमध्यें सांगण्याकरितां पराशराचें वचन आहे असें ह्मणतांच येत नाहीं. कारण, कलियुगांत जे धर्म आचरावयाचे तेच सांगण्याच्या उद्देशानें त्यानें संहिता केली आहे."

वर लिहिलेल्या युक्तींवरून व ग्रंथांतरांतल्या प्रमाणांवरून, माधवाचार्यांची व्याख्या पराशरसंहितेच्या उद्देशाशीं आणि पुनर्विवाह, ब्रह्मचर्य व सहगमन याविषयींच्या वचनांच्या त्याच्या स्वतांच्या व्याख्येशीं संगतवार जुळत नाहीं हें स्पष्ट

* चतुर्विंशति स्मृति व्याख्या, विवाह प्रकरण.

सिद्ध झालें. आतां, पुनर्विवाह कलियुगाकरितां योजलेला नाहीं ही कल्पना ज्या आधाराच्या जोरावर तो करितो त्याची वजनदारी कितपत आहे ती पाहूं.

स्त्रियांचा पुनर्विवाह कलियुगाखेरीज इतर युगांस लागू आहे, असें ह्मणण्यास पराशरसंहितेचा अथवा "नष्टे मृते" इत्यादिवचनांचा जो अगदीं उघड अर्थ आहे त्याचा आधार माधवाचार्यास अगदीं सांपडला नाहीं; तर केवळ आदिपुराणांतील एका वचनावरून त्यानें असें ह्मटलें. त्याचा भाव असा दिसतो; जरी पराशरसंहिता ही केवळ कलियुगांतील धर्म सांगण्याविषयींच झाली आहे व जरी स्त्रियांच्या पुनर्विवाहाचा विधि केला आहे, तरी आदिपुराणांत विवाहित स्त्रीच्या पुनर्विवाहाचा कलियुगांत निषेध केला आहे, यास्तव पराशराचा विधि कलियुग सोडून पूर्वीच्या युगांविषयीं आहे असें ह्मणावें.

या विचारास तीन बाधकें जबर्दस्त आहेत. पहिलें, जें वचन आदिपुराणांतून घेतलें आहे असें माधवाचार्य ह्मणतो तें आदिपुराणांतमुळींच आढळत नाहीं; आणि त्या ग्रंथाच्या मूळपीठिकेचा विचार केला असतां अशा प्रकारचें वचन त्यांत सांपडण्याचा संभवच नाहीं हें स्पष्ट दिसतें. तेव्हां माधवाचार्यानें ज्या वचनाचा उतारा केला त्यास आधारच नाहीं, व तशा वचनावरून केलेला सिद्धांत निराधारच होय. दुसरें, तें वचन आदिपुराणांत आहे असें मानिलें तरी त्याच्या जोरावर पराशराच्या वचनाचा अर्थ फिरवावा हें योग्य नव्हे; कारण, पराशरसंहिता ह्मणजे स्मृति होय

आणि आदिपुराण हा पुराण ग्रंथ होय; आणि स्मृति व पुराण यांचा परस्परांशीं विरोध आल्यास पुराणापेक्षां स्मृति बलवत्तर समजावी, ह्मणजे तशा ठिकाणीं पुराणाची आज्ञा न मानितां स्मृतीच्या आज्ञे प्रमाणें चालावें असें मागें (१९ व्या पृष्ठावर) स्पष्ट सिद्ध केलें आहे. या नियमावरून स्मृतिवचन व पुराणवचन यांचा विरोध आल्यास पुराणवचनांमुळें स्मृतिवचनांच्या अर्थांत फरक कधीं होणार नाहीं. तिसरें, विशेष विधीच्या प्राबल्याविषयीं मागल्या आध्यायांत जी रीत लिहिली आहे तिजवरून आदिपुराणांतल्या वचनानें पराशर स्मृतीच्या अर्थाचा संकोच न करितां उलटा पराशरस्मृतीमुळें आदिपुराणांतल्या वचनाच्या अर्थाचा संकोच केला पाहिजे. आदिपुराणांतील निषेध सामान्य आहे आणि पराशरसंहितेंतील विधि विशेष आहे; आणि सामान्य नियम विशेष नियमांचा बाधक न होतां उलटा विशेष नियमच सामान्य नियमाचा बाधक होईल.

आतां यावरून पाहा, स्त्रियांच्या पुनर्विवाहाविषयींचें पराशरवचन कलियुगाखेरीज इतर युगांस लागू आहे हें माधवाचार्याचें ह्मणणें (१) संहितेच्या उद्देशास व तात्पर्यास विरुद्ध आहे; (२) त्याच्या स्वतांच्या व्याख्यानास विरुद्ध आहे; (३) ज्यावचनामुळें हें ह्मणणें निघालें तें आदिपुराणांत नाहीं; (४) तें आहे असें घेतलें तरी स्मृति व पुराण यांचा विरोध आला असतां स्मृति बलवत्तर ह्या न्यासाच्या नियमास विरुद्ध आहे; (५) आणि विशेष नियमानें सामान्य नियमाचा बाध होतो या सर्वशास्त्रप्रसिद्ध

नियमासही विरुद्ध आहे. सारांश पराशराचें विवाहविषयक वचन कलियुगा खेरीज इतर युगांस लागू हें ह्मणणें अगदीं पळपळीत आहे.

कोणी असें ह्मणतील कीं, माधवाचार्य महान् विद्वान पुरुष होता; युक्ति प्रयुक्तीचा विचार अगदीं न करितां त्याचें जें मत असेल तें आम्ही मान्य करावें; तर याजवर आमचें एवढेंच ह्मणणें आहे कीं, माधवाचार्य खरोखर विद्वान मनुष्य होता व सर्व गोष्टींनीं तो मान्य होता; परंतु तो कधीं चुकणार नाहीं असा नव्हता व त्याचीं मतें सर्वदा प्रमाणभूतच असतात असें पूर्वींच्या ग्रंथांत मानलेलें नाहीं. त्याच्या ह्मणण्यांत जेव्हां चुका आढळतात तेव्हां त्याच्या मागून झालेले ग्रंथकार त्या काढून त्यांचें सपाटून खंडन करितात. तें असें:—

**यत्तु माधवः । यस्तु वाजसनेयीस्यात् तस्य सन्धिदिनात्परा । न क्वाप्यन्वाहितिः किन्तु सदा सन्धिदिने हि सा॥ इत्याह तत् कर्कभाष्य देवजानी श्रीअनन्तभाष्यादि सकल तच्छाखीय ग्रन्थविरोधाद्बव्हनादराच्चोपेक्ष्यं* ।**

“माधवाचार्यांचें हें ह्मणणें प्रमाणभूत मानतां येत नाहीं. कारण, तें कर्कभाष्य, देवजानी, श्री अनंतभाष्य इत्यादि जे वाजसनेयी शाखेचे ग्रंथ त्यांस विरुद्ध आहे आणि बहुत ग्रंथकारांनीं तें अमान्य केलें आहे.”

---

* निर्णयसिंधु, प्रथमपरिच्छेद.

माधवस्तु सामान्यवाक्यान्निर्णयं कुर्वन् भ्रांत एव। *

"माधवाचार्यांनीं सामान्य वाक्यावरून या गोष्टीचा निर्णय केला ही त्याची चूकच झाली."

कृष्णा पूर्वोत्तरा शुक्ला दशम्येवं व्यवस्थितेति माधवः। वस्तुतस्तु मुख्या नवमीयुतैव ग्राह्या। दशमी तु प्रकर्तव्या सदुर्गाद्विजसत्तमेत्यापस्तम्बोक्तेः *।

"माधवाचार्यांनीं हा नियम लिहिला; परंतु हा रास्त नव्हे, सबब आपणास दुसराच नियम मानिला पाहिजे."

मासिचाश्वयुजे शुक्ले नवरात्रे विशेषतः।
सम्पूज्य नवदुर्गांच नक्तं कुर्य्यात् समाहितः।
नवरात्राभिधं कर्म नक्तव्रतमिदं स्मृतम्॥

आरम्भे नवरात्रस्येत्यादिस्कान्दात् माधवोक्तश्च नक्तमेव प्रधानमिति चेत् न। नवरात्रोपवासतः इत्यादेरनुपपत्तेः। †

"हा विधि स्कंद पुराणांत आहे व माधवाचार्यांनींही सांगितला आहे ह्मणून हा मुख्य आहे असें ह्मटल्यास दुसऱ्या शास्त्रांची उपपत्ति न होतां तीं अगदीं खोटीं होतील."

अत्र यामत्रयादर्वाक् चतुर्दशिसमाप्तौ तदन्ते तदूर्ध्वगामिन्यान्तु प्रातस्तिथिमध्यएवेति हेमाद्रि माधवादयो व्यवस्थामाहुः तन्न। तिथ्यन्ते तिथिभान्तेवा पारणं यत्र चोदितम्। यामत्रयोर्ध्वगामिन्यां प्रातरेवहि पारणेत्यादि सामान्यवचनैरेव व्यवस्थासिद्धेरुभयाविधवाक्यवैयर्थ्यस्य दुष्परिहारत्वात्। ‡

---

*निर्णय सिंधु, प्रथम परिच्छेद.

†निर्णयसिंधु, द्वितीय परिच्छेद. ‡ निर्णय सिंधु, द्वितीय परिच्छेद.

"हेमाद्रि, माधवाचार्य वगैरेनीं ही व्यवस्था केली आहे, पण ती मानूं नये. कारण मानली असतां दोन्ही विधिवाक्यांस जें वैयर्थ्य येऊं लागेल त्याचा परिहारच होणार नाहीं."

**नच यदि प्रथमनिशायामेकतरवियोगस्तदापि ब्रह्म वैवर्तादिवचनाद्दिवापारणमनन्तभट्टमाधवाचार्य्योक्तं युक्तमिति वाच्यं। न रात्रौ पारणं कुर्य्यादृते वै रोहिणीव्रतात्। निशायां पारणं कुर्यात् वर्जयित्वा महानिशामिति संवत्सरप्रदीपधृतस्य न रात्रौ पारणं कुर्य्यादृते वै रोहिणीव्रतात्। अत्र निश्यपि तत् कार्यं वर्जयित्वा महानिशामिति ब्रह्माण्डोक्तस्य च निर्विषयत्वापत्तेः* ।**

"अनंतभट्ट व माधवाचार्य यांनीं सांगितलेला सिद्धांतच प्रमाण भूत असें म्हटलें तर संवत्सरप्रदीपांतील वचन व ब्रह्मांड पुराणांतील वचन यांस कोठें स्थलच मिळणार नाहीं."

या प्रमाणें माधवाचार्यांच्या मतांत ज्या चुका आढळल्या त्यांचें खंडन करण्यास कमळाकर भट्ट व रघुनंदन यांनीं मागें पुढें पाहिलें नाहीं. वास्तव माधवाचार्यांच्या म्हणण्यांत चूक असल्यास तें प्रमाणभूतच आहे असें मानितां येत नाहीं.

---

# अध्याय ३ रा.

## पराशराचें विवाहविषयक वचन मनुस्मृतीस विरुद्ध नाहीं.

आमच्या बहुतेक प्रतिपक्ष्यांच्या म्हणण्याचें पर्यवसान असें आहे कीं, विधवांचा विवाह मनुस्मृतीस विरुद्ध आहे. यावरून त्यांचा अभिप्राय असा दिसतो कीं, पराशर वचन कलियुगांत विधवाविवाहाचें विधायक आहे, तरी तें मनुस्मृतीस विरुद्ध आहे यास्तव तें पुढें लिहिलेल्या बृहस्पति वचना वरून त्याज्य आहे.

**वेदार्थोपनिबन्धृत्वात् प्राधान्यं हि मनोः स्मृतं ।**
**मन्वर्थविपरीता या सा स्मृति र्न प्रशस्यते* ॥**

"आपल्या संहितेंत मनूनें वेदार्थाचाच संग्रह केला आहे यास्तव त्याची संहिता मुख्य प्रमाण होय. आणि त्याच्या संहितेशीं विरुद्ध ज्या स्मृत्ति त्या प्रमाणभूत नव्हेत."

हें वरील म्हणणें सयुक्तिक दिसत नाहीं. बृहस्पति म्हणतो मनुसंहिता मुख्यप्रमाण, आणि तिजशीं विरुद्ध ज्या स्मृति त्या अप्रमाण, परंतु ती संहिता मुख्य प्रमाण कोणत्या युगांत मानावी हा विशेष तो सांगत नाहीं. आणि त्याज प्रमाणेंच महाज्ञानी जो पराशर तो स्पष्ट सांगतो कीं, मनुसंहिता ही केवळ सत्य* युगाविषयीं प्रमाण होय, अन्य युगाविषयीं नव्हे. पराशरानें हा विशेष सांगितला नसता

---

* हें कल्कभट्टानें उतरून घेतलें आहे.

* ५ व्या पृष्ठावर पाहा.

ह्मणजे आमच्या प्रतिपक्ष्यांच्या ह्मणण्याप्रमाणें बृहस्पतीच ह्मणणें सर्व युगांस सामान्यतः सारखें लागू होतें. यास्तव मनुसंहिता सत्ययुगांत मात्र मुख्य प्रमाण, इतर युगांत नव्हे, हें मान्य केलें पाहिजे. आणि मनुसंहितेस विरुद्ध अशा स्मृतींस अनुसरून हल्लीं किती एक गोष्टींचे संप्रदायलोकांत चालू आहेत, यावरून मनुसंहिता कलियुगांत मुख्य प्रमाण नव्हे हें उघडपणें सिद्ध होतें. वर लिहिलेले संप्रदाय असेः—

मनूनें ह्मटलें आहे—

**त्रिंशद्वर्षो वहेत् कन्यां हृद्यां द्वादशवार्षिकीं ।**
**त्र्यष्टवर्षोऽष्टवर्षां वा धर्मे सीदति सत्वरः ॥ ९.९४.**

"तीस वर्षांच्या पुरुषानें बारा वर्षांची आपल्या मनास आवडणारी अशी कन्या वरावी, किंवा चोवीस वर्षांच्या पुरुषानें आठ वर्षांची कन्या वरावी. हा नियम मोडणारास पातक लागतें."

**अष्टवर्षा भवेद्गौरी नववर्षा तु रोहिणी ।**
**दशमे कन्यका प्रोक्ता अत ऊर्ध्वं रजस्वला ।**
**तस्मात् संवत्सरे प्राप्ते दशमे कन्यका बुधैः ।**
**प्रदातव्या प्रयत्नेन न दोषः कालदोषतः॥** *

"आठ वर्षांच्या मुलीस गौरी, नऊ वर्षांच्या मुलीस रोहिणी आणि दहा वर्षांच्या मुलीस कन्या अशा संज्ञा आहेत. आणि दहा वर्षां नंतर कन्या रजस्वला होय. यास्तव कन्येस दहावें वर्ष लागलें ह्मणजे कसेंही करून कन्येचा वि-

---

* हीं वचनें उद्वाहतत्वांत आहेत.

वाह करून टाकावा. अशा प्रकारचा विवाह निषिद्धकालीं जरी केला तरी तत्प्रयुक्त दोष अगदीं लागत नाहीं."

या प्रमाणें अंगिरा ऋषीनें आठवें, नववें, आणि दहावें ह्या वर्षांत मुलीचें लग्न करावें, ह्मणजे मुलीच्या लग्नाचा योग्य काळ या वर्षांत आहे असें सांगितलें आहे. आणि दहा वर्षां पुढें राहिल्यास तिला जन्मभर लग्नावांचून राहावें लागेल, या भीतीस्तव तो असें सांगतो कीं, दहावर्षांच्या कन्येचें लग्न, ज्या दिवसांमध्यें लग्नाचा निषेध आहे त्या दिवसांत केलें तरी त्या विषयीं प्रत्यवाय नाहीं. परंतु विवाहा विषयीं पुरुषास चोविसावें, तिसावें अथवा दुसरें कोणतें ही एखादें वर्ष सांगून कांहीं कालमर्यादा त्यानें केली नाहीं. आतां असा विचार केला पाहिजे कीं, वर लिहिलेलीं मनु आणि अंगिरा यांचीं मतें, परस्परांशीं विरुद्ध आहेत किंवा नाहींत. मुलीच्या लग्नाचा काळ ह्मटला ह्मणजे आठवें अथवा बारावें वर्ष असें मनु ह्मणतो, आणि या खेरीज दुसऱ्या काळांत लग्न करणें दोषावह आहे असें सांगतो. आणि अंगिरा ह्मणतो कीं, मुलीचें लग्न आठ, नऊ अथवा दहा या वर्षांत केलें पाहिजे; त्यांत दहावें वर्ष ह्मणजे परमावधि झाला; यापुढें मुलीस लग्नावांचून ठेवितां कामास नये. यावरून त्याच्या मताप्रमाणें बारावें वर्ष ह्मणजे लग्नाचा योग्य काल मुळींच नव्हे. प्रस्तुत काळचा संप्रदाय अंगिराच्या मतास अनुसरून आहे, मनूच्या मतास अनुसरून नाहीं.

या गोष्टींत मनूच्या आज्ञेचें अनुसरण केलें असतां आठ वर्षांची मुलगी चोवीस वर्षांच्या वरास, व बारा वर्षांची

तीस वर्षांच्या वरास या प्रमाणेंच द्याव्या लागतील; नाहीं तर नियमभंग होईल. परंतु प्रस्तुत काळीं हा नियम चालू असल्याचें कोठें ही दिसत नाहीं. आणि आठव्या नवव्या अथवा दहाव्या वर्षी मुलीच्या लग्नाचा योग्य काळ होय, हा जो अंगिरा ऋषीचा नियम तोच (यादेशांत) बहुतेक सर्वत्र चालू असल्याचें दिसतें. यावरून विवाहकालाच्या निर्णयाविषयीं मनूचा नियम न मानितां त्याच्या विरुद्ध जो अंगिरा ऋषीचा नियम त्याचा अंगीकार लोक कारितात.

दुसरें मनु असें म्हणतो—

**एकएवौरसःपुत्रः पित्र्यस्य वसुनः प्रभुः ।**
**शेषाणामानृशंस्यार्थं प्रदद्यात्तु प्रजीवनम् ॥** ९.१६३.
**षष्ठन्तु क्षेत्रजस्यांशं प्रदद्यात् पैतृकाद्धनात् ।**
**औरसो विभजन् दायं पित्र्यं पंचममेव वा ॥** ९.१६४.
**औरसक्षेत्रजौ पुत्रौ पितृरिक्थस्य भागिनौ ।**
**दशापरे तु क्रमशो गोत्ररिक्थांश भागिनः ॥** ९.१६५.

"बापाच्या मालमत्तेचा वारस एक औरस पुत्र मात्र होतो; त्यानें बाकीच्यांस उपजीविकेसाठीं अन्नाच्छादन मात्र द्यावें."

"औरस पुत्रानें बापाच्या मालमत्तेची वांटणी केल्यास आपल्या बापाच्या क्षेत्रज पुत्रास तिचा एक पंचमांश अथवा षष्ठांश द्यावा."

"औरस व क्षेत्रज हे दोन पुत्र पित्याच्या मालमत्तेस वारस होतात. दुसरे दहा पुत्र गोत्र (कुळ कुळाचार) व

वडिलोपार्जित मालमत्तेचा भाग यांचें यथाक्रम वारस होतात."

यावरून मनूप्रमाणें पाहतां एका मनुष्यास औरस, क्षेत्रज, दत्तक इ० अनेक प्रकारचे पुत्र असले तर क्षेत्रज पुत्रास पित्याच्या मालमत्ते पैकीं पंचमांश अथवा षष्ठांश देऊन बाकीच्या सर्व मालमतेचा वारस औरस पुत्र होईल. आणि दत्तक इ० जे पुत्र त्यांस त्यानें कृपाकरून अन्नाच्छादन मात्र द्यावें. औरस पुत्र नसल्यास क्षेत्रज पुत्र सर्व माल मत्तेचा वारस होईल; क्षेत्रज पुत्र नसल्यास दत्तक पुत्र वारस होईल; आणि असाच क्रम पुढल्या पुत्रांविषयीं होय; ह्मणजे मागला नसेल तर पुढचा वारस होतो.

परंतु कात्यायन म्हणतो.—

**उत्पन्ने त्वौरसे पुत्रे तृतीयांशहराः सुताः ।**
**सवर्णा असवर्णास्तु ग्रासाच्छादनभागिनः॥***

"औरस पुत्र उत्पन्न झाला म्हणजे दुसरे पुत्र पित्याच्या जातीचे असल्यास त्यांस पित्याच्या मालमत्ते पैकीं तृतीयांश मिळतो; परंतु निराळ्या जातीचे असल्यास ते अन्नवस्त्राचे मात्र अधिकारी होतात."

यावरून कात्यायन मताप्रमाणें क्षेत्रज, दत्तक वगैरे जे पुत्र ते बापाच्याच जातीचे असल्यास त्याच्या मालमत्तेच्या तिसऱ्या हिशास अधिकारी होतात; पण निराळ्या जातीचे असल्यास केवळ अन्नवस्त्रास अधिकारी होतात. आतां मनु आणि कात्यायन यांचीं मतें परस्पराशीं विरुद्ध आहेत

*दायभागांत उतरून घेतलें आहे.

कीं नाहींत तीं पाहा. मनु क्षेत्रज पुत्रास मात्र बापाच्या मालमत्ते पैकीं पंचमांश अथवा षष्ठांश देऊन बाकीच्या सर्व प्रकारच्या पुत्रांस अन्नवस्त्र मात्र देण्यास सांगतो; आणि कात्यान क्षेत्रज व दुसरे जे पुत्र पित्याच्या जातीचे असतील त्या सर्वांसच पित्याच्या मालमत्तेपैकीं तृतीयांश द्यावा असें सांगतो. मनूच्या मताप्रमाणें पाहतां औरस पुत्र असल्यास दत्तक पुत्र अन्नवस्त्राचा मात्र अधिकारी होतो*. परंतु कात्यायन मताप्रमाणें तो तिसऱ्या हिशाचा वारस होतो. या गोष्टीविषयीं लोकांत चालू संप्रदाय पाहिला असतां मनूची आज्ञा न मानितां तिच्याविरुद्ध जी कात्यायनाची आज्ञा तीच मानितात, ह्मणजे हल्लींच्या काळांत औरस पुत्र कायम असतां दत्तक पुत्र केवळ अन्नवस्त्राचा अधिकारी न होतां पित्याच्या मालमत्तेच्या तिसऱ्या हिशाचा अधिकारी होतो. कलियुगामध्यें देखील मनुस्मृतीस विरुद्ध ज्या स्मृति त्या सर्व त्याज्य होत, असा जर बृहस्पतीचा अभिप्राय असता तर वरील गोष्टींत कात्यायन स्मृति कशी प्रबल मानली असती.

---

* परंतु पुत्राच्या अंगीं उत्तम प्रकारचे गुण असले तर तो औरसाबरोबर मालमत्तेचा वारस होतो. तें असें:—मनु,

**उपपन्नो गुणै सर्वैः पुत्रो यस्य तु दत्त्रिमः ॥**
**स हरेतैव तद्रिक्थं संप्राप्तोऽप्यन्यगोत्रतः ॥**

"सर्व सद्गुणांनीं युक्त असा पुत्र ज्यानें दत्तक घेतला आहे त्याच्या मालमत्तेचा वारस तो पुत्र दुसऱ्या गोत्रांतला असला तरी होईलच होईल."

तिसरें उदाहरणः—

मनु म्हणतो—

यस्या म्रियेत कन्याया वाचा सत्ये कृते पतिः।
तामनेन विधानेन निजो विंदेत देवरः॥ ९.६९.
यथाविध्यधिगम्यैनां शुक्लवस्त्रां शुचिव्रताम्।
मिथो भजेदाप्रसवात् सकृत् सकृदृतावृतौ॥ ९.७०
न दत्वा कस्यचित् कन्यां पुनर्दद्याद्विचक्षणः।
दत्वा पुनः प्रयच्छन् हि प्राप्नोति पुरुषानृतं॥ ९.७१.

"कन्या वाचादत्त झाल्या नंतर तिचा विवाह होण्या पूर्वींच तिचा वर मेला तर त्याच्या भावानें त्या कन्येस पुत्रोत्पत्ति होण्या करितां तिचा ह्या विधीनें स्वीकार करावा."

"तिनें पांढरें वस्त्र नेसावें आणि पवित्र व सदाचार असावें. अशा तिचा स्वीकार पुत्रोत्पत्तीकरितां करून दरएक ऋतूंत योग्यकाळीं एकएकवेळ, या प्रमाणें पुत्र होई पर्यंत त्यानें तिशीं गमन करावें."

"सुज्ञ मनुष्यानें आपली कन्या एका मागणारास वाणीनें एकवेळ दिल्यावर (विवाह होण्या पूर्वीं तो मागणारा मेला तर) ती पुनः दुसऱ्यास देऊं नये. कारण, जो पूर्वीं एकास दिलेली कन्या दुसऱ्यास देतो त्यास कन्या चोरल्याचा दोष लागतो."

ज्या वरास कन्या वाचादत्त झाली तो मेल्यास त्या कन्येचा विवाह करण्यास मनु वर सांगितल्या प्रमाणें निषेध करितो; त्या वराच्या भावानें तिचा यथाविधि स्वीकार करून तिला पुत्रोत्पत्ति करून द्यावी, असें सांगतो आणि पुत्रोत्पत्ति झाल्या-

वर तिला आमरणांत विधवा धर्मानें राहाण्या विषयीं आज्ञा करितो. यास्तव या मताप्रमाणें वाचादत्त कन्येचा वर, विवाहाच्या पूर्वीं मेल्यास ती विवाहास पात्र नाहीं; आणि वराच्या संततीचा विच्छेद होऊं नये ह्मणून दिरापासून तिला पुत्र झाला ह्मणजे तिनें यावज्जीव विधवाच राहावें असें आहे.

परंतु वासिष्ठ ह्मणतो:—

**अद्भिर्वाचा च दत्तायां म्रियेताथो वरो यदि ।**
**नच मंत्रोपनीता स्यात् कुमारी पितुरेव सा ॥**
**यावच्चेदाहृताकन्या मंत्रैर्यदि न संस्कृता ।**
**अन्यस्मै विधिवद्देया यथा कन्या तथैव सा ॥** अ० १७.

" अभिषेकें करून अथवा वाणीनें कन्यादान केल्या नंतर तिचा पति मेला तर तिचें विवाहमंत्रांनीं दान झालें नसल्यास ती कन्या पूर्वीं प्रमाणें पित्याचीच होय."

" विवाह संबंधी मंत्रांचा संस्कार न करितां केवळ वाणीनेंच कन्या दिली असल्यास तिचें दान यथाविधि दुसऱ्या वरास करावें. केवळ वाणीनें दिल्यामुळें तिचें कन्यात्व भग्न होत नाहीं."

या प्रमाणें, वाणीनें दिलेल्या कन्येचा मागणारा वर विवाह होण्या पूर्वीं मेला असतां त्याच्या मरणापासून तिचें कन्यात्व नाहींसें होत नाहीं, असें मानून तिचें दान यथाशास्त्र दुसऱ्या वरास करावें असें वसिष्ठ सांगतो.

आतां यावरून मनु व वासिष्ठ यांच्या स्मृतींत मोठा विरोध आहे किंवा नाहीं तो पाहा. कन्या मागणारा वर विवा-

हाच्या पूर्वींच मेल्यास मनु तिच्या विवाहाचा निषेध करितो, आणि तिनें त्याच्या भावापासून एक पुत्र उत्पन्न करून घेऊन पुढें आमरणांत विधवा राहावें असें सांगतो; आणि त्याच आपत्तींत वसिष्ठ तिचा विवाह करण्यास सांगतो. देशांतील हल्लीं चालू संप्रदाय वसिष्ठस्मृतीप्रममाणेंच आढळतो. ह्मणजे ज्यास कन्या देण्याचें ठरलें असतें तो विवाहाच्या पूर्वीं मेल्यास ती कन्या वसिष्ठस्मृतीप्रमाणें दुसऱ्या वरास लग्न करून देतात, मनुस्मृतीप्रमाणें तिला जन्मवर विधवा ठेवीत नाहींत.

याप्रमाणें पुष्कळ गोष्टींविषयीं लोकांतील संप्रदाय पाहिले असतां कलियुगांत मनुस्मृतींस विरुद्ध अशा दुसऱ्यांच्या स्मृतींस अनुसरून असलेले ते पुष्कळ आढळतात, आणि मनूनें सांगितलेले धर्म केवळ सत्ययुगासच लागू आहेत असें पराशर सांगतो ; तेव्हां बृहस्पतीनें सांगितलेलें जें मनूच्या स्मृतीचें प्रामाण्य व त्याच्या विरुद्ध दुसऱ्या स्मृतींचें अप्रामाण्य हीं फक्त सत्ययुगाविषयींच समजलीं पाहिजेत. नाहींतर मनूनें वेदार्थाचा संग्रह आपल्या स्मृतींत केला आहे, यास्तव तोच स्मृतिकर्ता मुख्य, असें बृहस्पतीचें वचन आहे तें असंगत होईल.— वेदार्थाचा संग्रह एकट्या मनूनेंच आपल्या स्मृतींत केला आहे आणि याज्ञवल्क्य, पराशर व दुसरे ऋषि यांनीं तो केला नाहीं काय ? त्यांनीं आपल्या स्मृतींमध्यें स्वकपोलकल्पित व वेदार्थास विरुद्ध असे धर्म लिहून ठेविले आहेत काय? त्यांस वेद समजत नव्हते किंवा त्यांनीं आपल्या संहितांत

वेदार्थाचा संग्रह केला नाहीं ही कल्पना करितांच येत नाहीं. तर वेदांचा आशय जसा मनूनें आपल्या साहिंतेंत दाखविला आहे तसाच त्यांनींही आपआपल्या सहितांत दाखविला आहे.

तर आतां मनूचें प्राबल्य स्थापण्याकरितां त्याच्या स्मृतींस बृहस्पतीनें जें कारण लावलें आहे तेंच दुसऱ्यांच्या ही स्मृतीस असल्यास मनूच एक श्रेष्ठ आणि दुसरे सर्व स्मृतिकर्ते त्याहून कमी, हात्याचा सिद्धांत सयुक्तिक कसा ह्मणवां येईल. ज्या गोष्टीमुळें एका ग्रंथास मुख्यत्व मानलें तीच दुसऱ्या ग्रंथांस लागू असल्यास तेही ग्रंथ तसेच मुख्य अवश्य मानिले पाहिजेत. सारांश, लोक सर्व ऋषींस सारखेच विद्वान व विचारशील असे मानतात, आणि त्या सर्वांनीं ही आपआपल्या ग्रंथांत वेदार्थाचा संग्रह केला आहे, यास्तव त्या सर्वांचा एकसारखाच श्रेष्ठपणा मानिला पाहिजे.

सर्व ऋषींचा श्रेष्टपणा सारखाच मानिला पाहिजे हा माझाच एकट्याचा सिद्धांत नव्हे. पराशरसाहिंतेवरील व्याख्येंत माधवाचार्यानें असाच सिद्धांत केला आहे. तो असाः—

**अस्तु वा कथंचिन्मनुस्मृतेः प्रामाण्यं तथापि प्रकृतायाः पराशरस्मृतेः किमायातं तेन । नाहि मनोरिव पराशरस्य महिमानं कचिद्वेदः प्रख्यापयाति । तस्मात्तदीयस्मृतेर्दुर्निरूपं प्रामाण्यम् ।**

“ अशा रीतीनें मनुस्मृतींस प्रामाण्य असेल तर असो; परंतु तेणेंकरून प्रकृतीं पराशरस्मृतींस काय विशेष झाला आहे. मनूच्या श्रेष्ठपणा सारखा पराशराचा श्रेष्ठपणा वेदांत

कोठें वर्णिलेला नाहीं; तस्मात् त्याच्या स्मृतींस प्रामाण्य स्थापन करणें कठिण आहे."

अशी शंका घेऊन पुढें त्यानें तिचें निवारण केलें आहे. तें असें:—

**नच पराशरमहिम्नोऽश्रौतत्वं सहोवाच व्यासः पाराशर्य्य इति श्रुतौ पराशरपुत्रत्वमुपजीव्य व्यासस्य स्तुतत्वात् । यदा सर्व्वप्रतिपन्नमहिम्नो वेदव्यासस्य स्तुतये पराशरपुत्रत्वमुपजीव्यते तदा किमु वक्तव्यमचिंत्यमहिमा पराशर इति । तस्मात् पराशरोऽपि मनुसमान एव । एष एव न्यायो वशिष्ठात्रियाज्ञवल्क्यादिषु योजनीयः ।**

"पराशराचा श्रेष्ठपणा वेदांत कोठें वर्णिलेला नाहीं असें नाहीं. 'पराशराचा पुत्र व्यास यानें ह्मटलें आहे' या (अर्थाच्या श्रुतीच्या) वाक्यांत व्यासाचा श्रेष्ठपणा पराशराचा पुत्र या संबंधानें मानिला आहे. मुळीं व्यासाचाच श्रेष्ठपणा सर्व संमत आहे, आणि त्यासही पराशराचा पुत्र या नात्यानें ज्यापक्षीं वेदांत मोठा मान दिला आहे, त्यापक्षीं स्वतः पराशराच्या श्रेष्ठपणाविषयीं कांहीं संशयच उरला नाहीं. तेव्हां पराशर ही मनूप्रमाणेंच श्रेष्ठ होय. वसिष्ठ, अत्रि, याज्ञवल्क्य, इत्यादि ऋषींविषयीं याच न्यायाची योजना करावी; ह्मणजे त्यांचाही मोठेपणा वेदांत वर्णिलेला आहे यास्तव तेही मनूप्रमाणेंच श्रेष्ठ होत."

यावरून निखालस असा निर्णय झाला कीं, ज्याअर्थीं संहितांचे सर्व कर्ते एक सारखेच महा ज्ञानी व विचारशील

असे मानिलेले आहेत; सर्वांनी आपआपल्या ग्रंथांत वेदार्थाचाच संग्रह केला आहे; आणि त्या सर्वांची ही प्रशंसा वेदांत केली आहे; त्या अर्थीं त्या सर्वांस आपण एक सारखाच सन्मान दिला पाहिजे. यामध्यें विशेष एवढाच आहे कीं, एक एका स्मृतीचें प्राबल्य एक एका युगांत विशेष असतें. ह्मणूनच सत्ययुगांत मनु स्मृति, त्रेतायुगांत गोतमस्मृति, द्वापारयुगांत शंख व लिखित यांच्या स्मृति प्रबल होत्या; आणि प्रस्तुतच्या कलियुगांत पराशरस्मृतिच प्रबल आहेत. यावरून मनु व पराशर या दोघांच्या स्मृति दोन निराळ्या युगांविषयीं असल्यामुळें त्या परस्परांत विरोध उत्पन्न होईल असा त्यांचा संबंधच नाहीं.

मागें लिहिलेल्या गोष्टींपासून जे सिद्धांत झाले ते असेः— मनु व पराशर यांच्या स्मृति निराळ्या दोन युगांविषयीं असल्यामुळें त्या परस्परांत विरोध नाहीं; बृहस्पतीनें सांगितलेलें मनु स्मृतींचें प्राबल्य व त्यांस विरुद्ध अशा स्मृतींचें दौर्बल्य केवळ सत्ययुगाविषयींच होय; मनु स्मृतींस विरुद्ध स्मृति हल्लींच्या युगांत प्रमाण भूत मानल्या आहेत. यास्तव पराशरानें सांगितलेला जो विधवापुनर्विवाह तो मनुस्मृतींस जरी कदाचित् विरुद्ध असला तरी देखील तो करण्यास अगदींच हरकत येत नाहीं.

आतां विधवा व दुसऱ्या स्त्रिया यांच्या विवाहाचें विधायक जें पराशराचें वचन तें मनु व दुसरे ऋषि यांच्या स्मृतींस विरुद्ध आहे किंवा नाहीं, याविषयीं विचार करूं.

मनु ह्मणतो—

**या पत्या वा परित्यक्ता विधवा वा स्वयेच्छया।**
**उत्पादयेत् पुनर्भूत्वा स पौनर्भव उच्यते॥** ९.१७५.

"विधवा झालेली अथवा नवऱ्यानें स्वेच्छेनें टाकलेली स्त्री जर (यथाविधि) पुनर्विवाह करील तर, त्या विवाहापासून झालेल्या पुत्रास पौनर्भव ह्मणतात."

विष्णु म्हणतो—

**अक्षताभूयः संस्कृता पुनर्भूः।** अ. १५.

"विवाह झाल्यानंतर ही पुरुषाचा संग न होतां जीस पुनः विवाह संस्कार होतो ती पुनर्भू होय."

याज्ञवल्क्य ह्मणतो—

**अक्षता च क्षता चैव पुनर्भूः संस्कृता पुनः** १.६७

"पुरुषाचा संग न झालेल्या अथवा झालेल्या ज्या स्त्रीस पुनः विवाह संस्कार होतो तीस पुनर्भू ह्मणतात."

वासिष्ठ ह्मणतो—

**या च क्लीबं पतितमुन्मतं वा पतिमुत्सृज्य अन्यं पतिं विन्दते मृते वा सा पुनर्भूर्भवति।** अ.१७

"नपुंसक, पतित, अथवा उन्मत (वेडा) अशा पतीप्रत सोडून अथवा पति मेल्यानंतर जी दुसरा पति करिते ती स्त्री पुनर्भू होय."

यावरून असें दिसतें कीं, मनु, विष्णु, याज्ञवल्क्य व वासिष्ठ यांनीं नवऱ्याचें पातित्य, नपुंसकपणा, उन्मत्तपणा अथवा मृत्यु या अडचणींमुळें स्त्रीचा पुनर्विवाह मान्य केला आहे.

मनु व दुसरे स्मृतिकर्ते यांनीं पौनर्भव (लावला असता त्या विवाहापासून तीस झालेला पुत्र) या पुत्राचें परिगणन केला, यावरून तो पुत्र सशास्त्र आहे, असें सांगण्याचा शब्दांचा अभिप्राय नाहीं; तर अशा प्रकारचा पुत्र झाल्यास त्यास पौनर्भव ह्मणावें, एवढें सांगण्याचाच त्यांचा अभिप्राय, असें विरुद्धपक्षाच्या कांहीं लोकांचें ह्मणणें आहे. परंतु हें केवळ ऐच्छिक आहे. यास आधार कांहींच नाहीं. कारण, निरनिराळ्या प्रकारच्या पुत्रांविषयीं ज्या स्मृतिकर्त्यांनीं वचनें लिहिलीं आहेत त्या सर्वांनीं पौनर्भव हा सशास्त्र वारस मानिलेला आहे.

औरसादि द्वादश पुत्रांचीं लक्षणें सांगून मनु शेवटीं असें ह्मणतो.—

**क्षेत्रजादीन् सुतानेतानेकादश यथोदितान् ।**
**पुत्रप्रतिनिधीनाहुः क्रियालोपान्मनीषिणः ॥९.१८०.**

"औरस पुत्र नसल्यास पित्याच्या श्राद्धपक्षाचा लोप होऊं नये ह्मणून क्षेत्रज इत्यादि अकरा प्रकारचे पुत्र सांगितले ते यथाक्रम औरस पुत्राचे प्रतिनिधि होतात, असें ऋषींनीं मानिलें आहे." आणि,

**श्रेयसः श्रेयसोऽभावे पापीयानृक्थमर्हति। ९.१८४.**

"कोणताही वरिष्ठ प्रतीचा पुत्र नसल्यास त्याच्या खालच्या प्रतीचा जो पुत्र असेल तो पित्याच्या मालमत्तेचा वारस होतो."

याज्ञवल्क्य ही औरसादि पुत्रांचीं लक्षणें सांगून पुढें असें ह्मणतो कीं,

श्रेषां पूर्वाभावे परः परः। २.१३२.

या पत्या कानकारच्या पुत्रांमध्यें पूर्वी पूर्वीं सांगितलेले पुत्र उत्पादये पुढचे पुढचे पुत्र पित्याच्या मालमत्तेचे यथाक्रम ,,देशीर वारस व त्यास पिंड देणारे असे होतात."

याप्रमाणें मनु व याज्ञवल्क्य यांनीं पौनर्भव पुत्रास कायदेशीर वारसाचा हक्क व श्राद्धकरण्याचा अधिकार हे सांगितले असतां त्यास बेकायदेशीर अथवा अशास्त्र ह्मणणें हें अगदींच अप्रयोजक आहे.

मनु, याज्ञवल्क्य, विष्णु व वसिष्ठ यांनीं कांहीं आपत्तींच्या प्रसंगीं स्त्रियांचा पुनर्विवाह मान्य केला आहे; यास्तव मनु व दुसरे स्मृतिकर्ते यांच्या मतास विधवाविवाह विरुद्ध आहे हें ह्मणणें अगदीं निराधार आहे. आणि हें ह्मणणें ज्यांनीं मनु व दुसरे स्मृतिकर्ते यांच्या स्मृतींचा पूर्ण अभ्यास केला नाहीं त्यांचेच असावेंसें दिसतें. कारण, त्यास्मृतींचें ज्ञान पूर्ण असल्यावर अशा निराधार व खोट्या मताचें प्रतिपादन कोणी करील असें वाटत नाहीं.

विधवाविवाह मन्वादि स्मृतिकर्त्यांच्या मतास वास्तविकच विरुद्ध नाहीं. इतकीच एक गोष्ट समजली पाहिजे कीं, दुसऱ्यावेळेस विवाह झालेल्या स्त्रियांस ते पुनर्भू ह्मणत असत आणि त्यांजपासून झालेल्या पुत्रांस पौनर्भव ह्मणत असत. आणि पराशराच्या मताप्रमाणें अशा स्त्रियांस व अशा पुत्रांस कलियुगांत तीं नांवें नाहींत, हा एवढाच काय तो फरक पराशर व अन्य स्मृतिकर्ते यांच्या मतांत आहे. पराशराच्या मनांत कलियुगांत त्या संज्ञा चालवायाच्या

असत्या तर त्यानें अशा स्त्रियांस पुनर्भू हा शब्द लावला असता आणि सांगितलेल्या पुत्रांच्या प्रकारांत पौनर्भव पुत्रांचें परिगणन केलें असतें. कलियुगामध्यें अशा स्त्रियांस पुनर्भू शब्द लावावयाचा नाहीं, आणि त्यांजपासून झालेल्या पुत्रांस पौनर्भव या प्रकारचे न मानितां औरसच मानावयाचे, हें चालू संप्रदायावरूनही सिद्ध आहे. पाहा कीं, वाणीनें एखाद्या पुरुषास कन्या दिल्यानंतर विवाह होण्यापूर्वींच तो पुरुष मेला अथवा दुसऱ्या कारणानें त्याजबरोबर व्हावयाचा विवाह रहित झाला तर त्या कन्येचा विवाह दुसऱ्या पुरुषाबरोबर होतो. मागील युगांत अशा स्त्रियांस पुनर्भू व त्यांच्या संततीस पौनर्भव असें ह्मणत असत. तें असें:—

**सप्त पौनर्भवाः कन्या वर्जनीयाः कुलाधमाः।**
**वाचा दत्ता मनोदत्ता कृतकौतुकमंगला ।**
**उदकस्पर्शिता या च या च पाणिगृहीतिका ।**
**अग्निं परिगता या च पुनर्भूप्रभवा च या ॥**
**इत्येताः काश्यपेनोक्ता दहन्ति कुलमग्निवत् ॥+**

हल्लींच्या काळांत वर सांगितलेल्या सात प्रकारच्या पुनर्भूंपैकीं वाग्दत्ता, मनोदत्ता, कृतकौतुकमंगळा आणि पुनर्भूप्रभवा या चार प्रकारच्या पुनर्भूंचा विवाह धडका चालूच आहे. अशा स्त्रियांस जरीं पूर्वींच्या युगांत पुनर्भू ह्मणत असत, तरी आतां त्यांस निराळें विशेषण लागत नाहीं, आणि सर्व गोष्टींमध्यें त्या, ज्यांचा प्रथमच विवाह संबंध

---

+ अर्थ ३३व्या पृष्ठावर पाहा.

झाला आहे त्यांजप्रमाणेंच मानल्या आहेत. आणि त्यांज पासून झालेले पुत्र पौनर्भव असें न मानतां सर्व गोष्टींविषयीं औरसच मानले आहेत. मातापितरांस पिंडदान करणें, त्यांच्या मालमत्तेचे वारस होणें वगैरे, पुत्रांनीं करावयाच्या गोष्टी ते औरस पुत्रांप्रमाणेंच करितात. त्यांस चुकूनही कधीं पौनर्भव असें ह्मणत नाहींत.

आतां असा विचार केला पाहिजे कीं, पूर्वींच्या युगांतील सात प्रकारच्या पुनर्भूंपैकीं चार प्रकारच्या पुनर्भूंचा विवाह सांप्रत चालू आहे, आणि प्रथमविवाहसंबंधाच्या स्त्रियांप्रमाणेंच त्या मान्य व पवित्र मानल्या असून त्यांस निराळ्या प्रकारचें विशेषणही नाहीं; आणि त्यांच्या अपत्यांस औरस पुत्रांपासून निराळें मानलें नाहीं. आतां जर राहिलेल्या तीन प्रकारच्या पुनर्भूंचा विवाह प्रचारांत आला तर वरील युक्तीनें त्यांसही प्रथमविवाहसंबंधाच्या स्त्रियांप्रमाणेंच मानण्याविषयीं व त्यांच्या पुत्रांस औरस मानण्याविषयीं कोणताही प्रतिबंध होणार नाहीं.

यावरूनच पराशर प्राचीन युगांतील पुनर्भूंस प्रथम विवाहसंबंधाच्या स्त्रियांचे, आणि प्राचीन काळच्या पौनर्भव पुत्रांस औरस पुत्रांचे हक्क व अधिकार देतो; आणि प्राचीन युगांतील चार प्रकारच्या पुनर्भू व पौनर्भव यांस प्रथम विवाहित स्त्रिया व औरस पुत्र असेच मानण्याचा प्रकार हल्लीं चालूही आहे; त्यापक्षीं पुनर्विवाह केलेल्या विधवा व त्यांचीं अपत्यें हीं प्राचीन युगांत पुनर्भू व पौनर्भव या संज्ञांनीं प्रसिद्ध होतीं, तरी आतां कलियुगांत प्रथम विवा

ह्याच्या स्त्रिया व औरस पुत्र यांपासून निराळीं मानलीं जाणार नाहींत.

पुनर्विवाहित विधवांचे पुत्र कलियुगांत औरस पुत्रच होत, या सिद्धांतास महाभारतही प्रमाण आहे. तें असें कीं, नागराज ऐरावत यानें आपली विधवा कन्या अर्जुनास दिली, आणि तिजपासून इरावान नांवाचा पुत्र झाला, तो अर्जुनाचा औरस पुत्र मानलेला आहे.

अर्ज्जुनस्यात्मजः श्रीमानिरावान्नाम वीर्य्यवान् ।
सुतायां नागराजस्य जातः पार्थेन धीमता ॥
ऐरावतेन सा दत्ता ह्यनपत्या महात्मना ।
पत्यौ हते सुपर्णेन कृपणा दीनचेतना ॥ *

" महात्मा असा जो नागराज ऐरावत त्यानें आपल्या कन्येचा पति सुपर्णानें मारल्यानंतर दुःखित झालेली आणि पोटीं संतान नसलेली ती दीन कन्या विवाह करून अर्जुनास दिली. नंतर अर्जुनापासून त्या कन्येस इरावान नांवाचा एक सुंदर व पराक्रमी असा पुत्र झाला."

अजानन्नर्जुनश्चापि निहतं पुत्रमौरसम् ।
जघान समरे शूरान् राज्ञस्तान् भीष्मरक्षिणः ॥

" अर्जुनही आपला औरस पुत्र मारला असें न जाणत भीष्माचें संरक्षण करणारे जे शूर राजे त्यांस रणांगणांत मारिता झाला."

---

* भीष्मपर्व, अध्याय ९१

यावरून असें दिसतें कीं, कलियुगाच्या* आरंभापासून प्राचीन युगांतील पौनर्भव पुत्रांस औरस पुत्रांत गणण्याचा संप्रदाय पडला.

आमच्या विरुद्धपक्षाच्या लोकांनीं विधवांचा विवाह मनूच्या मतीं निषिद्ध आहे, असें दाखविण्याकरितां मनूचीं वचनें उतरून घेतलीं आहेत, त्यांचा वास्तविक अर्थ व आशय काय आहे, याचा आतां विचार करूं. त्यांनीं आपला उद्देश साधण्याकरितां मनुवचनाचें हें पुढील अर्ध लिहिलें आहे.

न द्वितीयश्च साध्वीनां क्वचिद्भर्तोपदिश्यते । ५.१६२.

"साध्वी स्त्रियांस दुसरा पति आहे असें कोणत्याही शास्त्रांत ह्मटलें नाहीं."

परंतु या वाक्याचा वास्तविक अर्थ व मागील संदर्भाचें तात्पर्य यांचा विचार केला ह्मणजे आमच्या प्रतिपक्ष्यांचा हेतु तडीस जाणार नाहीं.

मृते भर्त्तरि साध्वी स्त्री ब्रह्मचर्य्ये व्यवस्थिता ।
स्वर्गं गच्छत्यपुत्रापि यथाते ब्रह्मचारिणः ॥ ५.१६०
अपत्यलोभाद्या तु स्त्री भर्तारमतिवर्त्तते ।
सेह निन्दामवाप्नोति पतिलोकाच्च हीयते ॥ ५.१६१
नान्योत्पन्ना प्रजास्तीह न चाप्यन्यपरिग्रहे ।
न द्वितीयश्च साध्वीनां क्वचिद्भर्तोपदिश्यते ॥ ५.१६२

---

*शतेषु षट्सु सार्द्धेषु त्र्यधिकेषुच भूतले ।
कलेर्गतेषुवर्षाणामभवन् कुरुपाण्डवाः ॥

"कलियुगाचा आरंभ झाल्यावर ६५३ वर्षांनीं कुरु आणि पांडव झाले." कल्हन याची राजतरंगिणी, तरंग १.

"ब्रह्मचाऱ्यांस पुत्र नसतां जशी स्वर्गप्राप्ति होते तद्वतच पति मरण पावल्यानंतर जी साध्वी स्त्री ब्रह्मचर्यव्रतानें राहते तिलाही पुत्र नसतां स्वर्गप्राप्ति होते."

"अपत्यप्राप्तीकरितां जी स्त्री भर्त्याखेरीज अन्यापाशीं गमन करिते तिची इह लोकीं निंदा होते; आणि मरणानंतर तिला पतिलोक प्राप्त होत नाहीं."

"कोण्या एखाद्या स्त्रीच्या उदरीं अन्य पुरुषापासून उत्पन्न झालेलें अपत्य त्या स्त्रीची प्रजा होत नाहीं. आणि दुसऱ्याच्या स्त्रीच्या उदरीं ज्या पुरुषापासून अपत्य उत्पन्न झालें, त्या पुरुषाचीही तें प्रजा होत नाहीं. आणि कोणत्याही शास्त्रांत साध्वी स्त्रियांच्या संबंधानें अन्य पुरुषांस पति ह्मटलेलें नाहीं."

वसिष्ठ ह्मणतो:—

**अनंताः पुत्रिणां लोकाः नापुत्रस्य लोकोऽस्तीति श्रूयते । अ. १७.**

"पुत्रवंतास अनंतकाल स्वर्गप्राप्ति आहे, आणि अपुत्रिकास स्वर्गप्राप्ति मुळींच नाहीं, असें वेदांत सांगितलें आहे."

या वचनावरून अपत्य नसलेली जी विधवा स्त्री आपणास स्वर्गप्राप्ति होणार नाहीं अशी भीति धरते, आणि स्वर्गप्राप्ति होण्याकरितां पुत्र व्हावा ह्मणून अन्य पुरुषापाशीं गमन करिते, ती ह्या लोकीं निंदेस पात्र होऊन स्वर्गलोकास अंतरते. कारण, अशास्त्ररीतीनें परक्यापासून झालेला पुत्र, शास्त्रांत त्या स्त्रीचा कायदेशीर पुत्र मानला नाहीं. तो उत्पादक परका पुरुष तिचा पतिच कां मानूं नये अशी शंका घेतल्यास मनु ह्मणतो कीं,

असा परका पुरुष साध्वी स्त्रीच्या संबंधानें पति कोणत्याही शास्त्रांत ह्मटला नाहीं; ह्मणजे स्वर्ग प्राप्ति होण्याकरितां आपल्या उदरीं पुत्रोत्पत्ति करावी ह्मणून जर एखादी स्त्री केवळ आपल्या इच्छेनें अशास्त्र रीत्या एखादा परक्या पुरुषापाशीं गमन करील तर तो पुरुष कोणत्याही शास्त्रानें तिचा पति असा मानला जाणार नाहीं. कारण, शास्त्रप्रतिपादित रीतीनें ज्या पुरुषाबरोबर ज्या स्त्रीचा विवाह झाला आहे त्या पुरुषास मात्र त्या स्त्रीच्या संबंधानें पति हा शब्द शास्त्रांत लावला आहे.

यास्तव आमच्या प्रतिपक्ष्यांनीं लिहिलेल्या अर्ध्या वचनाचा वास्तविक अर्थ असा आहे कीं, स्वर्गप्राप्तीकरितां पुत्र व्हावा ह्मणून उत्सुक झालेली विधवा अन्य पुरुषापाशीं गमन करील तर तो अन्य पुरुष तिचा पति ह्मणतां येत नाहीं. नाहींतर जर स्त्रीनें शास्त्रप्रतिपादित रीतीनें दुसऱ्या पुरुषापाशीं विवाह करावा तर तसि दुसरा पतिच होणें नाहीं, असा त्या वचनाचा अर्थ असता तर तो, स्वतः मनूनें पौनर्भव पुत्राविषयीं जो विधि सांगितला आहे त्यास विरुद्ध झाला असता—पौनर्भव पुत्रास मनूनें मातापितरांस पिंडदान करण्याचा व त्यांच्या मालमत्तेचा वारस होण्याचा अधिकार सांगितला आहे.

मनूच्या दुसऱ्या एका अर्ध्या वचनाचा, संदर्भानें जो वास्तविक अर्थ होतो त्याचा विचार नकरितां भलताच अर्थ घेऊन विधवाविवाह मनूच्या मतीं निषिद्ध आहे, असें सिद्ध

करण्याकरितां आमच्या प्रतिपक्ष्यांनीं आणखी एक प्रकार लिहिला आहे. तो असाः—

**न विवाहविधावुक्तं विधवावेदनं पुनः । ९.६५.**

"लग्नाच्या विधीमध्यें विधवांच्या पुनर्विवाहाचा उल्लेख कोठें केला नाहीं"

परंतु हें वचन वास्तविकच विधवांच्या विवाहाचें निषेधक मानलें असतां तें पौनर्भव पुत्रांविषयीं मनूनेंच सांगितलेल्या विधीस विरुद्ध होईल, हें त्या प्रतिपक्ष्यांच्या मनांत आलें नाहीं. वर लिहिलेलें अर्धेंच वचन घेऊन पाहिलें असतां, त्यांच्या आशयाप्रमाणें त्याचा अर्थ होईल खरा. परंतु मागचा पुढचा संदर्भ, ग्रंथकर्त्याचा उद्देश आणि प्रसंग हें सर्व पाहिलें असतां, वर लिहिलेला अर्थ व आशय कधीं स्थापन करतां येणार नाहींत. तें असें कीं:-

**देवराद्वा सपिण्डाद्वा स्त्रिया सम्यङ् नियुक्तया ।**
**प्रजेप्सिताधिगन्तव्या संन्तानस्य परिक्षये ॥ ९.५९.**
**विधवायां नियुक्तस्तु घृताक्तो वाग्यतो निशि ।**
**एकमुत्पादयेत् पुत्रं न द्वितीयं कथंचन ॥ ९.६०.**
**द्वितियमेके प्रजनं मन्यन्ते स्त्रीषु तद्विदः ॥**
**अनिर्वृत्तं नियोगार्थं पश्यंतो धर्म्मतस्तयोः ॥ ९,६१.**
**विधवायां नियोगार्थे निर्वृत्ते तु यथाविधि ।**
**गुरुवच्च स्नुषावच्च वर्तेयातां परस्परम् ॥ ९.६२.**
**नियुक्तौ यौ विधिं हित्वा वर्तेयातान्तु कामतः ।**
**तावुभौ पतितौ स्यातां स्नुषागगुरुतल्पगौ ॥ ९.६३.**
**नान्यस्मिन् विधवा नारी नियोक्तव्या द्विजातिभिः ।**

अन्यास्मिन् हि नियुंजाना धर्म्मं हन्युः सनातनम्॥ ९.६४.
नोद्वाहिकेषु मंत्रेषु नियोगः कीर्त्यते क्वचित् ।
न विवाह विधावुक्तं विधवावेदनं पुनः ॥ ९.६५.
अयं द्विजैर्हि विद्वद्भिः पशुधर्मो विगर्हितः ।
मनुष्याणामपि प्रोक्तो वेणे राज्यं प्रशासति॥ ९.६६.
स महीमखिलां भुंजन् राजर्षिप्रवरः पुरा ।
वर्णानां संकरं चक्रे कामोपहतचेतनः ॥ ९.६७.
ततः प्रभृति यो मोहात् प्रमीतपतिकां स्त्रियम् ।
नियोजयत्यपत्यार्थे तं विगर्हन्ति साधवः ॥ ९.६८.

"पतीच्या पोटीं संतान नसल्यास यथाविधि नियुक्त (अधिकार दिलेली) अशा पत्नीनें, अभीप्सित पुत्र आपल्या उदरीं पतीच्या बंधूपासून किंवा इतर सपिंड नातेवाइकापासून उत्पन्न करून घ्यावा."

"विधवेस पुत्रोत्पत्ति करून देण्याविषयीं नियुक्त ह्मणजे योजिलेल्या पुरुषानें आपल्या आंगास घृत लावून रात्रौ मौन धरून त्या विधीवेच्या उदरीं एकच पुत्र उत्पन्न करावा, दुसरा करूं नये."

"एकाच पुत्राच्या उत्पत्तीपासून नियोगाचा कायदेशीर हेतु शेवटास जाणार नाहीं, असें वाटून नियोगाच्या नियमांमध्यें निपुण अशा कितीएक ऋषींनीं विधवेच्या उदरीं दुसराही पुत्र उत्पन्न करण्याविषयीं सांगितलें आहे."

"विधवेचा नियोग केल्याचा हेतु यथाविधि शेवटास गेल्यानंतर त्या उभयतांनीं ( विधवेनें व उत्पादकानें ) परस्परांशीं सून आणि सासरा यांप्रमाणें वागावें."

"वरील हेतूकरितां योजिलेलीं स्त्रीपुरुषें विधि सोडून कामवासनेनें परस्परांशीं वागतील तर तीं पतित होतील; आणि तो पुरुष स्नुषे बरोबर जाणारा व ती स्त्री श्वशुरा बरोबर जाणारी अशीं मानलीं जातील."

"द्विजांनीं (ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांनीं) अन्यापासून गर्भधारण करण्याकरितां विधवेची योजना करूं नये. अन्यापासून गर्भधारण करण्याची योजना केली असतां, सतत चालणाऱ्या पातिव्रत्य धर्माचा भंग होईल."

"विवाहमंत्रामध्यें नियोग कोठें सांगितला नाहीं, व विवाहाच्या विधीमध्यें (पुत्रोत्पत्तिकारितां) विधवेचा अंगीकार करण्याविषयीं कोठें सांगितलें नाहीं."

"ज्ञानी द्विजांनीं हा संप्रदाय केवळ पशु जातीसच योग्य ह्मणून याची निंदा केली आहे; आणि वेण नांवाचा राजा राज्य करीत असतां मनुष्यांमध्येंही हा संप्रदाय चालू होता असें ह्मटलें आहे."

"वेणराजा, सर्व पृथ्वीचें राज्य मिळाल्यानंतर कामवासनेनें अंध होऊन वर्णसंकर करूंलागला."

"त्या वेळेपासून पुत्रोत्पत्तीकारितां विधवेची योजना मोहेंकरून करणाऱ्या पुरुषास साधु पुरुष दूषण देतात."

आतां या वचनांचा यथार्थ विचार केला असतां, हीं विधवांच्या विवाहाविषयीं आहेत असें दिसतें, किंवा क्षेत्रज (दुसऱ्याच्या स्त्रीच्या पोटीं उत्पन्न) पुत्राविषयीं आहेत असें दिसतें? यांत क्षेत्रज पुत्राविषयींच्या विचारास पहिल्या वचनापासून आरंभ होऊन शेवटच्या वचनानें त्याची स-

माप्ति झाली आहे;—ह्मणजे क्षेत्रज पुत्र उत्पन्न करण्याविषयीं-च्या विधीस उपक्रम करून त्याच्या निषेधीं उपसंहार झाला आहे, आणि मधल्या सर्व वचनांत त्याच विषयाचा संबंध आहे; त्यापक्षीं हें सर्व प्रकरणच दुसऱ्याच्या बायकोच्या पोटीं पुत्र उत्पन्न करावा किंवा न करावा याविषयींचें आहे. आतां विधवाविवाह मनूच्या मतास विरुद्ध आहे, असें ज्या वचनाच्या जोरावर आमचे प्रतिपक्षी भांडतात, तें वचन ह्या वरील प्रकरणांतच आहे. त्याविषयीं माझें ह्मणणें असें आहे कीं, त्या वचनाच्या पूर्वार्धांत नियोग शब्द आहे, आणि त्याचा अर्थ, क्षेत्रज पुत्राच्या उत्पत्तीचा विधि, असाच निःसंशय आहे, त्यापक्षीं त्या वचनाच्या उत्तरार्धांतील संशयितार्थक जो **वेदन** शब्द त्याचाही अर्थ, संदर्भवशात, क्षेत्रज पुत्र उत्पन्न करण्याकरितां दुसऱ्याच्या स्त्रीचा अंगीकार करणें, असाच मानला पाहिजे. **वेदन** हा शब्द **विद्** धातू पासून निघाला आहे, आणि **विद्** धातूचा अर्थ पावणें अथवा अंगीकार करणें, असा आहे. तेव्हां **वेदन** शब्दाचा अर्थ, स्त्रीच्या हस्ताचा अंगीकार करणें, मग तो विवाहांत असो अथवा क्षेत्रज पुत्राच्या उत्पत्तीकरितां असो.—यास्तव **वेदन** शब्दाचा अर्थ, तो विवाह प्रकरणांत आढळल्यास विवाह, आणि क्षेत्रज पुत्राच्या प्रकरणांत आढळल्यास क्षेत्रज पुत्र उत्पन्न करण्याकरितां स्त्रीचा अंगीकार असा होतो, असें मानलें पाहिजे. उदाहरणें ;

**न सगोत्रां न समानप्रवरां भार्य्यां विंदेत ।***

---

* विष्णुसंहिता, अध्याय २४ वा.

"वरानें आपल्या गोत्राची व आपल्या प्रवराची अशी भार्या आपणास 'नविंदेत,' वरूं नये." ह्मणजे अशा भार्येचें पाणिग्रहण करूं नये.

हें वचन विवाहप्रकरणांतलें आहे तेव्हां विद् धातूच्या विंदेत या रूपाचा अर्थ विवाहांत पाणिग्रहण करणें, असा झाला. पुनः ;

**यस्या म्रियेत कन्याया वाचा सत्ये कृते पतिः ।**
**तामनेन विधानेन निजो विन्देत देवरः ॥**
**यथा विध्याधिगम्यैनां शुक्लवस्त्रां शुचिव्रताम् ।**
**मिथोभजेदाप्रसवात् सकृत् सकृदृतावृतौ ॥**

"वाग्दान झाल्यानंतर विवाहविधि होण्याच्यापूर्वी कन्येचा पति मरण पावल्यास त्या पतीच्या भावानें ती कन्या 'विंदेत' ह्मणजे पुत्रोत्पत्तीकरितां अंगीकारावी"
"तिनें पांढरें वस्त्र नेसावें आणि पवित्र व सदाचार असावें. अशा तिचा स्वीकार पुत्रोत्पत्तीकरितां करून दरएक ऋतूंत योग्य काळीं एकएक वेळ, याप्रमाणें पुत्र होईपर्यंत त्यानें तिशीं गमन करावें."

हीं वचनें उघडपणें क्षेत्रज पुत्राच्या उत्पत्तीविषयीं आहेत, ह्यामुळें विद् या धातूचें '**विंदेत**' हें रूप क्षेत्रज पुत्राच्या उत्पत्तीकरितां स्त्रीचा स्वीकार करणें अशा अर्थी मानलेलें आहे. यास्तव असा सिद्धांत होतो कीं ;

**न विवाहविधावुक्तं विधवावेदनं पुनः ।**

"विवाहाच्या विधीमध्यें विधवेचें **वेदन** सांगितलें नाहीं" या क्षेत्रजपुत्राच्या उत्पत्तीविषयींच्या वाक्यांत **विद्** धातूच

'वेदन' हें रूप असल्यामुळें त्याचा अर्थ क्षेत्रज पुत्राच्या उत्पत्तीकरितां स्त्रीचा अंगीकार करणें, असा अवश्य केलाच पाहिजे, नाहींतर ग्रंथस्वारस्य व संदर्भ हीं नष्ट होतील. वाचणाऱ्यांस या सगळ्या वचनाच्या दोन व्याख्यानांपैकीं संगतवार व शुद्ध कोणतें याचा निर्णय करितां येण्यासाठीं हीं दोन्हीं पुढें एकमेकांच्या समोरासमोर लिहिलीं आहेत.

| | |
|---|---|
| "विवाहमंत्रांमध्यें नियोग, ह्मणजे क्षेत्रज पुत्राच्या उत्पत्तीविषयीं आज्ञा कोठें सांगितली नाहीं, व विवाहविधीमध्यें क्षेत्रज पुत्राच्या उत्पत्तीकरितां विधवेचा अंगीकार करण्याविषयींही सांगितलें नाहीं." | "विवाहमंत्रांमध्यें नियोग, ह्मणजे क्षेत्रज पुत्राच्या उत्पत्तीविषयीं आज्ञा कोठें सांगितली नाहीं, व विवाह विधीमध्यें विधवेच्या लग्नाविषयींही सांगितलें नाहीं." |

या वाक्यांत मनूस नियोगधर्माचा (क्षेत्रज पुत्राच्या उत्पत्तीचा) निषेध सांगणें आहे, ह्मणून तो स्पष्ट ह्मणतो कीं, सर्व विवाह मंत्रांपैकीं एकांत देखील नियोग सांगितला नाहीं, व विवाहविधिमध्यें वेदन (पुत्रोत्पत्ती करण्याकरितां विधवा स्त्रीचा स्वीकार करणें) सांगितलें नाहीं.—ह्मणजे नियोग हें एक प्रजोत्पादनाचें साधन आहे; आणि ज्याअर्थीं विवाहाचा मुख्य उद्देश प्रजोत्पादन हा आहे, त्याअर्थीं नियोग आणि वेदन हे मनु एकप्रकारचे विवाहच मानतो. आणि विवाहाच्या मंत्रांमध्यें व विधीमध्यें त्यांचा संग्रह नसल्यामुळें ते अशास्त्र असा सिद्धांत करतो. नियोग प्रकरणांतील एका स्मृतीच्या पूर्वार्धांत क्षेत्रज पुत्राच्या उत्पत्तीचा

निषेध करून तिच्याच उत्तरार्धांत अप्रासंगिक व अप्रकांत अशा विधवाविवाहाचा निषेध मनु करील हें सयुक्तिक दिसत नाहीं. विवाहमंत्रांमध्यें नियोगधर्म सांगितला नाहीं हें ह्मणणें नियोगाबद्दलच्या प्रकरणास अगदीं लागूनच आहे; परंतु विवाहविधीमध्यें विधवांच्या पुनर्विवाहाविषयीं सांगितलें नाहीं हें ह्मणणें त्या प्रकरणाच्या विषयास व आशयास सर्वथा असंबद्ध आहे. स्मृतिकार नियोगधर्माचा विचार करीत असतां मध्यें एकाएकींच तो विधवाविवाहाचा उपक्रम कां करील ! वरील वचनांत **वेदन** शब्द घातला आहे, **विवाह**-शब्द घातला नाहीं. **वेदन** शब्दाचे, विवाहांत पाणिग्रहण करणें आणि नियोगधर्माप्रमाणें प्रजोत्पत्तीकरितां पाणिग्रहण करणें हे दोन अर्थ आहेत. त्यांपैकीं वरील वचनामध्यें संबंधवशात दुसराच अर्थ घ्यावयाचा. जे **वेदन** शब्दाचा अर्थ विवाह असा करून विधवाविवाहाचा निषेध स्थापन करण्याची खटपट करितात ते स्मृतींच्या मर्माचें आपणास अज्ञान आहे, असें मात्र प्रगट करितात.

हें प्रकरण नियोगाविषयींच आहे विधवाविवाहाविषयीं नाहीं, असें देवगुरु जो बृहस्पति त्यानें या स्मृतीविषयीं जें लिहिलें आहे त्यावरूनही दृढ होतें. तें असें:—

**उक्तो नियोगो मनुना निषिद्धः स्वयमेव तु ।**
**युगऱ्हासादशक्योऽयं कर्तुमन्यैर्विधानतः ।**
**तपोज्ञानसमायुक्ताः कृतत्रेतादिके नराः**
**द्वापरे च कलौ नृणां शक्तिहानिर्हि निर्म्मिता ॥**
**अनेकधा कृताः पुत्रा ऋषिभिर्य्ये पुरातनैः ।**

न शक्यास्तेऽधुना कर्तुं शक्तिहीनैरिदंतनैः ॥*

"नियोग हा स्वतः मनूनेंच सांगितला आहे आणि त्याचा निषेधही त्यानेंच केला आहे. युगपरत्वें करून मनुष्याची इंद्रियसंयमन करण्याची शक्ति कमी होत असल्यामुळें, नियोगाचे नियम यथाशास्त्र राखण्याचें त्यांच्या हातून होणार नाहीं. सत्य, त्रेता आणि द्वापार या युगांत मनुष्य तपस्वी व विशेष ज्ञानी होते. परंतु मनुष्याची शक्ति कलियुगामध्यें कमी केली आहे. पूर्वींचे ऋषि अनेक प्रकारचे पुत्र उत्पन्न करीत असत; ते हल्लींच्या दुर्बल मनुष्यांपासून उत्पन्न होणें अशक्य आहे."

ह्मणजे नियोगप्रकरणांत पहिल्या पांच स्मृतींमध्यें नियोगाचें व्यक्तरीतीनें विधान करून पुढल्या पांच स्मृतींमध्यें त्याचाच स्पष्टरीतीनें निषेध केला आहे. एकाच ठिकाणीं एकाच गोष्टीचें विधान करून लागलाच त्याचा निषेध करणें, हें अगदींच गैरशिस्त दिसतें.

या अडचणीचा उलगडा बृहस्पतीनें केला तो असा कीं, मनूनें नियोगाचें विधान सत्य, त्रेता आणि द्वापार या युगांविषयीं केलें; आणि त्याचा निषेध कलियुगाविषयीं केला. यावरून मनुस्मृतींतील नियोग प्रकरणाविषयीं बृहस्पतीचें जें ह्मणणें आहे त्यापासून तें सर्व प्रकरण नियोगाविषयींच आहे असें खचीत सिद्ध होतें.

याठिकाणीं दुसरें एक असें सांगतों कीं, नारदस्मृति ह्या मनुस्मृतीचाच एक भाग आहे. मनूच्या मोठ्या सं-

* कुल्लुक भट्टानें आपल्या ग्रंथांत या स्मृति घेतल्या आहेत.

हितेचा नारदानें संक्षेप केला आहे त्या संक्षेपास नारद-संहिता असें ह्मणतात. मनुसंहिता या नावानें हल्लीं जो ग्रंथ लोकांत प्रसिद्ध आहे तो भृगूनें जुळला असल्यामुळें त्यास कधीं कधीं भृगुसंहिता असेंही ह्मणतात तद्वतच नारदाच्या संक्षेपास नारदसंहिता ह्मणतात. नारदसंहिते-च्या आरंभीं पुढें लिहिलेलीं वाक्यें आढळतातः—

भगवान् मनुः प्रजापतिः सर्व्वभूतानुग्रहार्थमाचार स्थितिहेतुभूतं शास्त्रं चकार । तदेतत् श्लोकशत-सहस्रमासीत् । तेनाध्यायसहस्रेण मनुः प्रजापति रुपनिबध्य देवर्षये नारदाय प्रायच्छत् स च त-स्मादधीत्य महत्वान्नायं ग्रन्थः सुकरो मनुष्याणां धारयितुमिति द्वादशभिः सहस्रैः संचिक्षेप तच्च सुमतये भार्गवाय प्रायच्छत् । स च तस्मादधीत्य तथैवायुर्ह्रासादल्पीयसी मनुष्याणां शक्तिरिति ज्ञात्वा चतुर्भिः सहस्रैः संचिक्षेप । तदेतत् सुम-तिकृतं मनुष्या अधीयते। विस्तरेण शतसाहस्रं देवगन्धर्व्वादयः । यत्रायमाद्यः श्लोको भवति

असीदिदं तमोभूतं न प्राज्ञायत किंचन ।
ततःस्वयंभूर्भगवान् प्रादुरासी च्चतुर्मुखः ॥

इत्येवमधिकृत्य क्रमात् प्रकरणात् प्रकरणमनुक्रान्तम् । तत्रतु नवमं प्रकरणं व्यवहारो नाम यस्येमां देवर्षिर्ना-रदः सूत्रस्थानीयां मातृकां चकार ।

"सर्व प्राण्यांवर अनुग्रह करण्याकारितां त्यांचा आचार शुद्ध राखण्याचें साधनभूत असें एक शास्त्र (संहिता) भगवा-

न् प्रजापति जो मनु यानें रचलें. त्याचे एक लक्ष श्लोक असून अध्याय एक हजार होते. मनूनें तें शास्त्र देवर्षि जो नारद यास दिलें ; आणि नारदानें त्याजपाशीं याचें अध्ययन केलें, आणि तें शास्त्र फार मोठें असल्यामुळें मनुष्यांस संपादन करण्यास कठिण ह्मणून त्याचा संक्षेप बारा हजार श्लोकांत करून तें भृगुवंशांतील सुमति यास दिलें. सुमतीनें नारदापाशीं त्याचें अध्ययन केलें, आणि मनुष्याची आयुष्य मर्यादा कमी झाल्यामुळें त्याच्या शक्तीचा न्हास होणार असें पाहून त्यानें त्याचा संक्षेप चार हजार श्लोकांत केला. तें हें सुमतीनें केलेलें शास्त्र मनुष्य पढतात. आणि मूळचें लक्ष श्लोकात्मक शास्त्र देव आणि गंधर्व हे पढतात. त्याच्या आरंभीचा श्लोक हा:—'हें विश्व तमोमय होतें, यांत कांहीं इंद्रियगोचर नव्हतें, नंतर चार तोंडांचा भगवान् स्वयंभु ब्रह्मदेव प्रादुर्भूत झाला.' या आरंभींच्या श्लोकानंतर एका मागून एक विषयाचीं प्रकरणें क्रमशः लिहिलीं आहेत त्यांतील नववें प्रकरण व्यवहाराबद्दल आहे, त्याची रचना देवर्षि जो नारद त्यानें याप्रमाणें केली आहे."

यावरून नारदाच्या स्मृति ह्या मनुस्मृतीचाच निष्कर्ष आहे, हें उघड आहे; कारण, नारदानें मनूच्या एक लाख स्मृतींचाच संक्षेप केला आहे. या मनुसंहितेच्या नारदकृत संक्षेपांत, 'पतीचा पत्ता लागेनासा झाला' इत्यादि पांच आपत्तींच्या प्रसंगीं स्त्रियांचा पुनर्विवाह करण्याविषयीं आज्ञा आहे, असें मागें एका ठिकाणीं दर्शविलें आहे. तर ही आज्ञा पराशरानेंच दिली असें न मानतां मनूनेंही

दिली आहे असें मानलेंच पाहिजे; या कारणास्तवच "पती-चा पत्ता लागेनासा झाला" इत्यादि अर्थाच्या वचनावरील माधवाचार्यांच्या व्याख्येंत घेतलेलें वचन मनुसंहितेंतील ह्मणूनच घेतलें आहे. तें असें:—

मनुरपि,

नष्टे मृते प्रव्रजिते क्लीबे च पतिते पतौ।

पंचस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते ॥*

यावरून असें निखालस सिद्ध होतें कीं, विधवाविवाह मनूच्या मतास विरुद्ध नसतां सर्वथा त्याच्या मतास अनुसरूनच आहे; आणि पराशरानें वरील वाक्य शब्दशः व अक्षरशः मनूपासूनच घेतलें असतां विधवाविवाह मनुस्मृतीस विरुद्ध आहे असें स्थापन करण्याची खटपट करणें अगदीं निष्फल आहे.

---

## अध्याय. ४

### पराशराचें विधवाविवाहविधायकवचन वेदांस विरुद्ध नाहीं.

स्त्रियांच्या पुनर्विवाहा विषयींची पराशराची आज्ञा वेदांच्या अभिप्रायास विरुद्ध आहे असें सिद्ध करण्याकरितां कांहीं प्रतिपक्ष्यांनीं यत्न केला आहे. हें करण्यांत त्यांचा हेतु असा आहे कीं, या देशांत वेद हें सर्वांमध्यें श्रेष्ठ प्रमाण आहे. तेव्हां पराशराचें वचन त्यास विरुद्ध असलें ह-

---

* याचा अर्थ ९ व्या पृष्ठावर पाहा.

णजे तें आचाराविषयीं कोणी मानणार नाहीं. कारण, वेदव्यासानें असा सिद्धांत केला आहे कीं:—

श्रुतिस्मृतिपुराणानां विरोधो यत्र दृश्यते ।
तत्र श्रौतं प्रमाणंतु तयोर्द्वैधे स्मृतिर्वरा ॥+

ज्या वेदवाक्याशीं पराशरवचन विरुद्ध आहे असें ह्मणतात तें हें:—

यदेकस्मिन् यूपे द्वे रशने परिव्ययति तस्मादेको द्वे जाये विंदेत । यन्नैकां रशनां द्वयोर्यूपयोः परिव्ययति तस्मान्नैका द्वौ पती विंदेत ॥

"एका यज्ञस्तंभाच्या भोंवतीं दोन रशना* बांधतां येतात तशा एका पुरुषास दोन बायका करतां येतात; परंतु एक रशना दोन स्तंभांभोंवतीं बांधतां येत नाहीं त्याप्रमाणें एका स्त्रीस दोन पति करतां येत नाहींत."

विधवाविवाह वेदविरुद्ध आहे, हें त्यांचें ह्मणणें केवळ याच वचनाच्या आधारावर आहे. "एका स्त्रीस दोन पति करतां येत नाहींत" हें वाक्य आढळतांच एकदम विधवाविवाह वेदविरुद्ध आहे या सिद्धांतावर आमच्या प्रतिपक्ष्यांनीं उडी मारली. तथापि त्या वेदवाक्याचा वास्तविक आशय असा नव्हे. तर त्याचा आशय हा कीं, एका यज्ञस्तंभाच्या भोंवतीं दोन रशना एककालीं बांधतां येतात तशा एका मनुष्यास एककालीं दोन स्त्रिया करतां येतात; आणि एक रशना एकाचकालीं दोन यज्ञस्तंभांभोंवती

+ अर्थ १९व्या पृष्ठावर पाहा.
* यज्ञांतील नियमित लांबीची एक दोरी.

बांधतां येत नाहीं तसे एका बायकोस एकाच कालीं (एक जिवंत असल्यावेळींच दुसरा पति करून एकंदर) दोन पति करतां येत नाहींत. परंतु पहिला पति मेल्या नंतर तिला दुसरा पति करतां येत नाहीं असा आशय नाहीं. ही कल्पना माझी केवळ स्वकपोल कल्पित आहे असें नाहीं. महाभारतावरील टीकाकार नीलकंठ यानें वेदांतीलच एक वाक्य घेऊन त्यावर व्याख्या केली आहे त्या व्याख्येवरून व मूळ वाक्यावरून ही वरील अर्थच दृढ होतो. तें वाक्यः—

**नैकस्या बहवः सह पतयः ।***

"एका स्त्रीस बहुत पति एककालीं होत नाहींत."

**व्याख्या.**

**सहेति युगपद्बहुपतित्वनिषेधो विहितो न तु समयभेदेन।†**

"या वेदवाक्यांतील सहशब्दानें, स्त्रीस एकाच वेळेस बहुत पति असण्याचा निषेध केला आहे; परंतु निरनिराळ्या वेळेस बहुत पति असण्याचा निषेध नाहीं."

याप्रमाणें विधवांचा विवाह वेदास विरुद्ध आहे असें जें आमच्या वादींचें मत आहे तें अगदीं खोटें ठरलें. वेदाचाच आशय आपल्या स्मृतींमध्यें ऋषींनीं आणिला आहे हें सर्व मान्य आहे, तेव्हां वेदाविरुद्ध अशा विवाहाचा विधि ते कधीं करतेना आणि त्याचा संप्रदायही प्राचीन काळें कधीं चालतांना हा विचार या वादींनीं करावयाचा होता.

---

* हें वाक्य पराशरसंहितेच्या व्याख्येंत माधवाचार्यांनीं घेतलें आहे.

† आदिपर्व अध्याय १९५.

# अध्याय ५.

(मूलग्रंथांत अध्याय ८.)

## दीर्घतमाचे निषेध विधवाविवाहास लागू नाहींत.

पुढें लिहिलेल्या महाभारतांतील वचनाच्या आधारावरून स्त्रीस या जगांत एकच पति असावा असें कांहीं प्रतिपक्ष्यां चें ह्मणणें आहे.

दीर्घतमा उवाच ।

अद्यप्रभृति मर्य्यादा मया लोके प्रतिष्ठिता ।
एक एव पतिर्नार्य्या यावज्जीवं परायम् ॥
मृते जीवति वा तस्मिन्नापरं प्राप्नुयान्नरम् ।
अभिगम्य परं नारी पतिष्यति न संशयः ॥

या वचनाचा अर्थ ते असा करितातः—"दीर्घतमा ह्मणतो, स्त्रीला सर्व जन्मभर एकच पति असावा. तो जिवंत असतां व मेल्यावरही तिनें अन्य पुरुषाबरोबर संबंध करूं नये. जर अन्य पुरुषाबरोबर संबंध करील तर ती पतित होईल यांत संशय नाहीं." ही व्याख्या रास्त असती तर विधवापुनर्विवाहाविषयीं त्यांची अडचण कदाचित् खरी झाली असती. परंतु त्या वाक्याचा अर्थ मुळींच अगदीं निराळा आहे. तो असा, "स्त्रीनें यावज्जीव फक्त आपल्या पतीचेंच अनुसरण करावें. तो जिवंत असतां व त्याच्या मरणानंतरही तिनें दुसऱ्या पुरुषांशीं जाऊं नये इ०" पुरातन काळीं जो व्यभिचाराचा संप्रदाय फार चालू होता, त्याचा निषेध या वाक्यानें केला आहे. पुनर्विवाहाचा निषेध नव्हे.

पुरातनकाळीं व्यभिचाराचा संप्रदाय फार चालू होता

हें महाभारताच्या दुसऱ्या एका भागांत सांगितलें आहे. तें असें:—

> ऋतावृतौ राजपुत्रि स्त्रिया भर्त्ता पतिव्रते ।
> नातिवर्त्तव्य इत्येवं धर्म्मं धर्म्मविदो विदुः ॥
> शेषेष्वन्येषु कालेषु स्वातंत्र्यं स्त्री किलार्हति ।
> धर्म्ममेवं जनाः सन्तः पुराणं परिचक्षते ॥+

पंडु कुंतीस ह्मणतो;—"हे पतिव्रते राजकन्ये, धर्मज्ञ पुरुषांचें मत असें आहे कीं, प्रत्येक ऋतुकाळांत* स्त्रीनें पतीशिवाय अन्य पुरुषापाशीं जाऊं नये; बाकीच्या काळांत स्त्री स्वेच्छेनें अन्य पुरुषापाशीं गेली तरी चिंता नाहीं, असा हा पुरातन धर्म ( संप्रदाय ) आहे असें साधुजन ह्मणतात"

ह्मणजे आपणापासून उत्पन्न होणारी संतति पतीच्याच पोटची आहे अशी खात्री होण्याकरितां स्त्रियांनीं गर्भ धारणाच्या दिवसांत मात्र पतीखेरीज अन्य पुरुषापाशीं जाऊं नये; अन्य दिवसांत त्यांनीं पाहिजे तर दुसऱ्यापाशीं जाऊन राहवें, हा संप्रदाय प्राचीन काळीं धार्मिष्ठपुरुषांस मान्य होता. हा स्त्रियांचा बहुत दिवसांपासून चालत आलेला स्वेच्छाचार बंद करण्याकरितां दीर्घतमा यानें याचा निषेध केला आहे. तेव्हां स्त्रियांनीं अन्य पुरुषापाशीं संबंध ठेवण्याचा हा निषेध अर्थात व्यभिचाराविषयीं आहे, यथाशास्त्र पुनर्विवाह करण्याविषयीं तो निषेध नाहीं. ग्रंथसंदर्भावरूनही हेंच दिसतें:—

---

+ महाभारत आदिपर्व अध्याय १२२.

* रजस्वला झाल्यापासून १६ दिवसपावेतों गर्भ धारणाचा ऋतु (काळ) आहे त्या दिवसांत.

पुत्रलाभाच्च सा पत्नी न तुतोष पतिं तदा ।
प्रद्विषन्तीं पतिर्भार्य्यां किंमां द्वेक्षीति चाब्रवीत् ।
प्रद्वेष्युवाच ।
भार्य्याया भरणाद्भर्त्ता पालनाच्च पतिः स्मृतः ।
अहं त्वां भरणं कृत्वा जात्यन्धं ससुतं सदा ।
नित्यकालं श्रमेणार्त्ता न भरेयं महातपाः ॥
तस्यास्तद्वचनं श्रुत्वा ऋषिः कोपसमन्वितः ।
प्रत्युवाच ततः पत्नीं प्रद्वेषीं ससुतां तदा ।
नीयतां क्षत्रियकुलं धनार्थश्च भविष्यति ॥
प्रद्वेष्युवाच ।
त्वया दत्तं धनं विप्र नेच्छेयं दुःखकारणम् ।
यथेष्टं कुरु विप्रेन्द्र न भरेयं यथा पुरा ॥
दीर्घतमा उवाच ।
अद्यप्रभृति मर्य्यादा मया लोके प्रतिष्ठिता ।
एक एव पति र्नार्य्या यावज्जीवं परायणम् ॥
मृते जीवति वा तस्मिन्नापरं प्राप्नुयान्नरम् ।
अभिगम्य परं नारी पतिष्यति न संशयः ॥
अपतीनांतु नारीणामद्यप्रभृति पातकम् ।
यद्यस्ति चेद्धनं सर्व्वं वृथाभोगा भवन्तु ताः ।
अकीर्त्तिः परिवादाश्च नित्यं तासां भवन्तु वै ॥
इति तद्वचनं श्रुत्वा ब्राह्मणी भृशकोपिता ।
गंगायां नीयतामेष पुत्रा इत्येवमब्रवीत् ॥
लोभमोहाभिभूतास्ते पुत्रास्तं गोतमादयः ।
बद्ध्वोडुपे परिक्षिप्य गंगायां समवासृजन् ॥

कस्मादन्धश्च वृद्धश्च भर्तव्यो यमिति स्म ह ।
चिन्तयित्वा ततः क्रूराः प्रतिजग्मुरथो गृहान् ॥

"दीर्घतमा याच्या बायकोस पुत्र झाले होते. पुढें ती आपल्या पतीची इच्छा तृप्त करीना. हें पाहून पति दीर्घतमा यानें तूं माझा द्वेष कां करितेस असें विचारिलें. तिनें उत्तर दिलें कीं, नवरा बायकोचें पोट भरतो ह्मणून त्यास तिचा भर्ता ह्मणतात व पालन करितो ह्मणून पति ह्मणतात. तूं जन्मांध आहेस आणि तुला व तुझ्या पुत्रांना पोसण्या करितां मला फार कष्ट पडतात; तर या उपर मी तुझें पोषण करणार नाहीं. हें ऐकून त्या ऋषीस क्रोध आला आणि तो बायकोस व पुत्रांस ह्मणाला कीं, मला राजाकडे न्या ह्मणजे तुह्मांस धन मिळेल. बायको ह्मणाली, तूं संपादिलेलें द्रव्य दुःखास कारण आहे, तें मला नको. तुझ्या इच्छेस येईल तें तूं कर. मी आजपर्यंत केलें तसें या उपर तुझें पोषण करणार नाहीं. दीर्घतमा ह्मणाला, या जगामध्यें मी अशी आज्ञा करतों कीं, स्त्रीनें आमरणांत पतीपाशींच रहावें. तो जिवंत असतां व त्याच्या मरणानंतर तिनें अन्य पुरुषापाशीं संबंध ठेवूं नये, आणि जी ठेवील ती खचीत पतित होईल. आपल्या पतीची हेलना करून आजपासून अन्य पुरुषापाशीं संबंध ठेवणाऱ्या स्त्रिया पातकी मानल्या जातील; त्यांजपाशीं धन असल्यास त्याचा त्यांस उपभोग घडणार नाहीं व नेहमी त्यांची दुष्कीर्ति राहील. हें त्याचें भाषण ऐकून ती बायको रागावून पुत्रांस ह्मणाली कीं, यास (पतीस) गंगेंत नेऊन टाका.

मोह व लोभ यांनीं अंध झालेल्या गौतमादि पुत्रांनीं तें मान्य केलें. अंध व वृद्ध पित्याचें पोषण उगीच कशा करितां करावें असें मनात आणून त्यांनीं त्यास ताफ्यावर बांधून गंगेंत नेऊन टाकलें."

या वरील मजकुरावरून, बायकोनें पोषण करण्याचें नाकारल्या मुळें तिला शिक्षा करण्याकरितां दीर्घतम्यानें असा विधि केला कीं, बायकोनें नवऱ्यालाच अनुसरावें व नवऱ्या विषयीं हयगय करणाऱ्या स्त्रिया पातिष्ठ होतील. बायकोनें तिरस्कार केलेला पाहून त्यास असें वाटलें कीं, दुसऱ्या पुरुषा बरोबर जाण्या करितां ही मला सोडीत आहे. आणि या गोष्टीचा राग येऊन बहुत दिवसांपासून चालत आलेल्या स्त्रियांच्या स्वेच्छाव्यवहाराची बंदी करण्याकरितां त्यानें निषेध केला. प्राचीन काळीं धर्मिष्ठ लोक हा संप्रदाय रीतीचा मानून यात कांहीं दूषण ठेवीत नव्हते. तेव्हां दीर्घतम्याची बायको त्या संप्रदायानें चालती तर तीस कांहीं दोष न लागता. यास्तव दीर्घतम्यानें व्यभिचार करणारी स्त्री पतित व दोषी होईल असा विधि केला. कोणत्याही आपत्तीच्या प्रसंगीं शास्त्रविधीप्रमाणें पुनर्विवाह व इतर पुरुषाशीं संबंध हीं स्त्रियांनीं करूं नयेत, असा त्याच्या वचनाचा अर्थ असता तर स्वतः दीर्घतम्यानेंच या गोष्टी नंतर लागलाच बलिराजाची राणी सुदेष्णा हिच्या उदरीं क्षेत्रज पुत्र उत्पन्न केला तो केला नसता. तो प्रकार असाः—

श्लो० स्रोतस्तदा विप्रः प्लवमानो यदृच्छया ।
जगाम सुबहून् देशानन्धस्तेनोडुपेन ह ॥

तन्तु राजा बलिर्नाम सर्व धर्मविदां वरः ।
अपश्यन्मज्जनगतः स्रोतसाभ्यासमागतम् ॥
जग्राह चैनं धर्मात्मा बलिः सत्यपराक्रमः ।
ज्ञात्वैवं स च वव्रेऽथ पुत्रार्थे भरतर्षभ ॥
सन्तानार्थं महाभाग भार्य्यासु मम मानद ।
पुत्रान् धर्मार्थकुशलानुत्पादयितुमर्हसि ॥
एवमुक्तः स तेजस्वी तं तथेत्युक्तवानृषिः ।
तस्मै स राजा स्वां भार्य्यां सुदेष्णां प्राहिणोत्तदा ॥

"नंतर तो अंध ब्राह्मण त्या तराफ्यासहवर्त्तमान प्रवाहांतून वाहतां वाहतां बहुत देशांतून गेला. धर्म जाणणाऱ्या सर्व लोकांत श्रेष्ठ असा बलिराजा गंगेंत स्नान करीत होता, त्यानें तो ब्राह्मण वाहत वाहत आपल्या जवळ आल्याचें पाहिलें; त्याला थांबवून त्याजपासून त्याचा सर्व वृत्तांत ऐकिला; आणि त्यास विनंती केली कीं, आपण कृपाकरून माझ्या भार्येच्या उदरीं धर्म व अर्थ या दोहोंमध्यें कुशल असे पुत्र उत्पन्न करावे. ही विनंती मान्य केल्यावरून राजानें आपली राणी सुदेष्णा त्याजकडे पाठविली."

पतीखेरीज अन्य पुरुषापाशीं जाण्याविषयीं जे नियम सांगितले आहेत त्यांप्रमाणें जाण्याचा ही दीर्घतमा यानें निषेध केला असतां तर, बलिराजाच्या राणीच्या उदरीं क्षेत्रज पुत्र उत्पन्न करण्याचें मान्य करून त्यानें आपला सूत्रांचाच नियम खचीत मोडला नसता. क्षेत्रज पुत्र उत्पन्न करण्याकरितां दुसऱ्या पुरुषाकडे राणीला पाठविण्याविषयीं त्यानें राजास खचीत प्रतिबंध केला असता.

भारतांत आणखीं असें आढळतें कीं, नागराज ऐरावत या
च्या विधवा कन्येशीं अर्जुनानें विवाह केला. विधवाविवा
हा विषयीं दीर्घतमा याचा निषेध असता तर तो निषेध
झाल्या दिवसा नंतर ऐरावत नागराज यानें आपल्या विध
वा कन्येचा अर्जुनाशीं विवाह करण्याचा विचार काढला
नसता. सारांश, अन्य पुरुषापासून क्षेत्रज पुत्राची उत्प
त्ति करणें, व पतीच्या मरणानंतर पुनर्विवाह करणें, या
गोष्टी शास्त्रसंमत आहेत; आणि बहुत दिवसांपासून चा
लत आलेला शास्त्रविरुद्ध जो व्यभिचार त्याचा निषेध
दीर्घतमा यानें केला आहे. त्या निषेधाचा या दोन्ही गोष्टीं
शीं कांहीं संबंध नाहीं. मागें लिहिल्याप्रमाणें दीर्घतमा
याचा निषेध बहुत दिवसांपासून चालत आलेल्या व्यभि
चारा विषयींच आहे हें उघड आहे.

आतां वरील वचनाचा दुसऱ्या रीतीनें विचार करूं
तें पुनर्विवाहाचें निषेधक आहे असें घेतलें तरीं, दीर्घतमा
याचा निषेध सांप्रत काळीं विधवाविवाहास प्रतिबंधक
होईल, या ह्मणण्यास तें मुळींच बळकटी आणणार नाहीं;
कारण, त्या वचनांत विशेष युगाचा उल्लेख नसल्यावरून
तें सर्व युगांस साधारण लागू असून सामान्य आहे. आणि
मागें सांगितल्याप्रमाणें पराशराचें वचन केवळ कलियुगा
सच लागू आहे ह्मणून तें विशेष आहे. सामान्य व वि
शेष वचनांची प्रसक्ति एकत्र आली असतां विशेषानें सा
मान्याचा बाध होतो, या नियमाप्रमाणें पराशराच्या वचना
नें दीर्घतम्याच्या वचनाचा बाधच झाला पाहिजे. दीर्घ
तम्याचें वचन कलियुगाविषयींच आहे, असें घेतलें तरी

देखील स्त्रियांच्या पुनर्विवाहाचा सर्वथा प्रतिबंध करावा, असा त्याचा अर्थ होणारच नाहीं. कारण, त्याचा निषेध अगदीं सामान्य आहे आणि पराशरानें पांच आपत्तींच्या प्रसंगीं पुनर्विवाहाचें विशेष विधान केलें आहे. आणि विशेष नियमानें सामान्य नियमाचा बाध झालाच पाहिजे.

---

## अध्याय ६.

(मूलग्रंथाचा अध्याय १०)

**पराशरसंहितेंत अन्य युगांतील धर्मांचें प्रतिपादन नसून फक्त कलियुगांतील धर्मांचेंच प्रतिपादन आहे.**

कोणाचें ह्मणणें असें आहे कीं, पराशरसंहितेंत सांगितलेले धर्म केवळ कलियुगांतलेच आहेत असें नाहीं. तर दुसऱ्या युगांतीलही आहेत. या ह्मणण्यांतला हेतु असा दिसतो कीं, पराशरसंहितेंत कलियुगांतल्या धर्मांखेरीज इतरयुगांतले धर्म सांगितले आहेत, असें सिद्ध झालें तर, विधवा व दुसऱ्या विवाहित स्त्रिया यांच्या पुनर्विवाहाविषयीं पराशरानें लिहिलेला नियम कलियुगास लागू न करितां अन्ययुगास लागू करितां येईल. आणि विधवा विवाह कलियुगांत शास्त्रसंमत होणार नाहीं. पराशरसंहितेंत अश्वमेध करणें, शुद्रजातींतील दास, नापित, आणि गोपाल वगैरे यांचें अन्न खाणें, ब्रह्मचाऱ्यास अशौचाचा काळ कमी करणें इत्यादि विधि सांगितले आहेत हे सत्य, त्रेता आणि द्वापार याच युगांतील धर्म आहेत, कलियुगांतील नव्हेत, अशा समजुतीनें प्रतिपक्षी यांनीं ही हरकत काढली आहे;

परंतु पूर्वी सिद्ध केल्याप्रमाणें कालिधर्म सांगण्याचाच एक पराशरसंहितेचा उद्देश आहे अशी खात्री होते. यास्तव त्या संहितेत दुसऱ्या युगांतील धर्म सांगितले असतील असें ह्मणण्यास तिळप्रायही आधार नाहीं. यावरून व संहिते-च्या उद्देशावरून अश्वमेधादि विधि केवळ अन्ययुगांतीलच धर्म आहेत असें सिद्ध होत नाहीं. प्रतिपक्षी यांस आदि पुराण, बृहन्नारदीयपुराण व आदित्यपुराण यांजमध्यें कलि-युगांत अश्वमेधादिकांचा निषेध केला आहे, असें आढळ-ल्यावरून ते अन्ययुगांतील धर्म आहेत असा सिद्धांत त्यांनीं केला याविषयीं त्यांचें अनुमान असें दिसतें.—पूर्वींच्या युगांत अश्वमेधादि धर्म करण्याविषयीं मोकळीक असून ते घडत-ही असत. परंतु कांहीं ग्रंथांमध्यें ते कलियुगांत करण्या-विषयीं निषेध केला आहे. यास्तव ते कलियुगांतील धर्म नव्हेत; आणि ज्याअर्थीं हे पराशरसंहितेंत सांगितले आहेत त्याअर्थीं कलियुगाखेरीज अन्ययुगांतीलही धर्म परा-शरसंहितेंत सांगितले आहेत असें होतें.

या ह्मणण्याचा विचार करण्याकरितां आदि, बृहन्नार-दीय व आदित्य या पुराणांतील निषेध कलियुगांत मानता-त किंवा नाहीं हें पाहिलें पाहिजे. आमच्या देशाच्या रीतीभातींचा इतिहास आह्मांमध्यें नसल्यामुळें, वरील गो-ष्टींची पूर्ण माहिती होणें असंभवनीच आहे. परंतु होण्या-सारखा बारीक शोध आहे तितका करतां असें स्पष्ट समजतें कीं, वर सांगितलेल्या पुराणांतील निषेध कोणी मानीत नाहींत त्या तीन ग्रंथांत निषिद्ध केलेले कांहीं धर्म कलियुगांत केल्याविषयीं चांगलीं प्रमाणें आहेत; तेव्हां असा निषेध

असतां त्या धर्मांचें आचरण केलें, यास्तव तो निषेध कलियुगांत मानतात, असें प्रतिपादन कसें करतां येईल ? विवाहित स्त्रीचा पुनर्विवाह ; ज्येष्ठबंधूस उत्तम भाग ; समुद्रपर्यटन ; संन्यासग्रहण ; द्विजांचा निरनिराळ्या जातींच्या कन्यांशीं विवाह; दिरापासून पुत्रोत्पत्ति ; मधुपर्कामध्यें पशूचावध ; श्राद्धामध्यें मांसभक्षण ; वानप्रस्थाश्रमधारण ; एकास दिलेल्या कन्येचें पुनः दान ; बहुत वर्षेंपर्यंत ब्रह्मचर्य ; नरमेध, अश्वमेध अथवा गोमेध ; आमरणांत यात्रा ; अग्नीमध्यें प्रवेश ; ब्राह्मणाला देहांत प्रायश्चित्त ; दत्तक व औरस यांखेरीज इतर प्रकारच्या पुत्रांचा पुत्रत्वेंकरून स्वीकार; वेदांतील विद्वत्ता व आंगचें पावित्र्य यांच्या मानानें अशौचकालाची न्यूनता ; शूद्रजातीच्या दास, नापित आणि गोपाल वगैरेंनीं दिलेल्या अन्नाचें भक्षण ; हे व दुसरे कांहीं धर्म आदि, बृहन्नारदीय व आदित्य या पुराणांमध्यें कलिवर्जांत सांगितले आहेत. यांपैकीं अश्वमेध अग्नीमध्यें प्रवेश, सन्यास, बहुतवर्षेंपर्यंत ब्रह्मचर्य, समुद्रपर्यटन, दूरची तीर्थयात्रा आणि विधवांचा पुनर्विवाह, हे धर्म कालियुगामध्यें घडत असल्याविषयीं स्पष्ट प्रमाण आहे. तें याप्रमाणें:— कलियुग लागल्यानंतर ६५३ वर्षांनीं पांडव उत्पन्नझाले त्यांनीं अश्वमेध व दूरदेशाची यात्रा हीं केलीं. या गोष्टी सर्व लोकांस इतक्या माहीत आहेत कीं, त्यांजविषयीं प्रमाण सांगण्याचें जरूरच नाहीं. यांखेरीज नागराज ऐरावत याच्या विधवाकन्येशीं अर्जुनानें विवाह केल्याचें मागें ( ७७ व्या पृष्ठावर ) सांगितलें आहे.

विक्रमादित्याच्यापूर्वीं पांचसातशें वर्षांच्या सुमारास

शूद्रक नांवाचा राजा झाला होता त्यानें अश्वमेध याग व अग्निप्रवेश केल्याचें स्पष्ट प्रमाण आहे. तें असें:—

ऋग्वेदं सामवेदं गणितमथ कलां वैशिकीं हस्तिशिक्षां
ज्ञात्वा शर्वप्रसादाद्व्यपगततिमिरे चक्षुषी चोपलभ्य ।
राजानं वीक्ष्य पुत्रं परमसमुदयेनाश्वमेधेन चेष्ट्वा
लब्ध्वा चायुःशताब्दं दशदिनसहितं शूद्रकोऽग्निं प्रविष्टः ॥*

"तो (शूद्रक) ऋग्वेद, सामवेद, गणित, चौसष्ट कला आणि हस्तिशिक्षणविद्या यांत निष्णात होता, व शिवप्रसादें करून त्याचें दृष्टिमांद्य जाऊन नजर साफ झाली होती. त्यानें आपला पुत्र राज्यपदावर बसलेला पाहिला, अश्वमेध याग केला; आणि शंभर वर्षें दाहा दिवस वांचून त्यानें शेवटीं अग्निप्रवेश केला. +"

---

* मृच्छकटि नाटक, उपोद्घात.

\+ स्कंदपुराणामध्यें भविष्य कथनाध्यायीं या शूद्रक राजाविषयीं असें लिहिलें आहे कीं,

त्रिषु वर्षसहस्रेषु कलेर्यातेषु पार्थिव ।
त्रिशते च दशन्यूने ह्यस्यां भुवि भविष्यति ।
शूद्रको नाम वीराणामधिपः सिद्धसत्तमः ॥
नृपान् सर्वान् पापरूपान् वर्द्धितान् यो हनिष्यति ।
चर्चितायां समाराध्य लप्स्यते भूभरापहः ॥
ततस्त्रिषु सहस्रेषु दशाधिकशतत्रये ।
भविष्यं नंदराज्यं च चाणक्यो यान् हनिष्यति ।
शुक्लतीर्थे सर्वपाप निर्मुक्तिं योऽभिलप्स्यते ॥
ततस्त्रिषु सहस्रेषु सहस्राभ्यधिकेषु च ।
भविष्यो विक्रमादित्यो राज्यं सोऽत्र प्रलप्स्यते ॥

"कलियुग लागल्यानंतर ३२९० वर्षांनीं या पृथ्वीवर शूद्रक नावाचा

प्रवरसेन राजानें चारवेळ अश्वमेध केले असल्याविषयीं चांगलें प्रमाण आहे. त्या राजानें देवशर्माचार्य नावाच्या ब्राह्मणास इनाम जमीन दिली, तिच्या सनदेंत असें स्पष्ट लिहिलें आहे कीं,

**चतुरश्वमेधयाजिनः विष्णुवृद्धसगोत्रस्य सम्राजः काटकानां महाराजश्रीप्रवरसेनस्य इत्यादि ।** *

" विष्णुवृद्ध राजाचा वंशज, चार अश्वमेध यज्ञ करणारा, काटकांचा राजा जो प्रवरसेन इ० "

याच सनदेमध्यें प्रवरसेनाच्या पूर्वजांनीं दहावेळ अश्वमेध केले असल्याविषयीं असें लिहिलें आहे कीं,

**दशाश्वमेधावभृथस्नातानाम् ।** *

" दहावेळ अश्वमेध केलेले "

काश्मीर देशाचा राजा मिहिराकुल यानें अग्निप्रवेश केल्याविषयीं असें लिहिलें आहे कीं,

**स वर्षसप्ततिं भुक्त्वा भुवं भूलोकभैरवः ।**
**भूरिरोगार्दितवपुः प्राविशज्जातवेदसम् ॥** †

" मोठ्या भयंकर स्वभावाच्या मिहिराकुल राजानें ७०

---

राजा उत्पन्न होईल. तो सर्व योगांमध्यें अग्रणी व सिद्धांमध्यें प्रमुख होईल. तो सर्व पापरूपी बलिष्ठ राजांचा वध करील. त्याविना सर्व आराधना केल्यानंतर त्याला योगसिद्धि होईल. त्यानंतर २० वर्षांनीं ( कलियुग लागल्यानंतर ३३१० वर्षांनीं ) नंदकुलांतील राजे बलिष्ठ होतील, त्यांचा वध चाणक्य या नावाचा ( राजा ) करील आणि शुक्रतीर्थीं ईश्वराराधनाकरून तो पापनिर्मुक्त होईल, त्यानंतर ६९० विक्रमादित्य राजा होईल. "

* सन १८३६ च्या नोवेंबर महिन्याच्या एशियाटिक सोसैटीचें जर्नल या नावाच्या पुस्तकाचें ७२८ वें पृष्ठ पाहा. † कल्हण याची राजतरंगिणी, तरंग १.

वर्षे राज्यकरून अनेक रोगांनीं पीडा दिल्यामुळें अग्निप्रवेश केला."

मिहिराकुल राजानें सिंहलद्वीपास सैन्य नेऊन तेथील राजास पदभ्रष्ट केलें. यावरून त्याच्यावेळीं समुद्रपर्यटन निषिद्ध नव्हतें. तें असें:—

स जातु देवीं संवीतसिंहलांशुककंचुकाम् ।
हेमपादांकितकुचां दृष्ट्वा जज्वाल मन्युना ॥ २९६
सिंहलेषु नरेंद्रांघ्रिमुद्रांकः क्रियते पटः ।
इति कंचुकिना पृष्टेनोक्तो यात्रां व्यधात्ततः ॥ २९७
तत्सेनाकुंभिदानांभो निम्नगाकृतसंगमः ॥
यमुनालिंगनप्रीतिं प्रपेदे दक्षिणार्णवः ॥ २९८
स सिंहलेन्द्रेण समं संरम्भादुदपाटयत् ।
चिरेण चरणस्पृष्टप्रियालोकनजां रुषम् ॥ २९९*

"सिंहलद्वीपांत विणलेल्या कापडाची चोळी राणीनें अंगांत घातली होती. त्या कापडावर पायाच्या आकृतीचे सोन्याचे बुट्टे होते त्यांपैकीं कांहींबुट्टे राणीच्या स्तनांवर आले होते. ते पाहून राजास मोठा संताप आला. आणि अंतःपुरांतील सेवकास विचारतां त्यानें सांगितलें, कीं, सिंहलद्वीपांत राजाच्या पायाच्या आकृतीच्या बुट्टीचें कापड विणतात. हें ऐकून राजानें सिंहलद्वीपावर स्वारी केली. यावेळीं त्याच्या सेनेंतील हत्तींच्या तोंडांतून बाहेर पडलेल्या पाण्याचा ओघ दक्षिण समुद्रास मिळाला. तेणेंकरून त्या समुद्रास यमुनानदीचें आलिंगन केल्याप्रमाणें आनंद झाला. मिहिराकुल राजानें सिंहलद्वीपच्या राजाबरोबर युद्ध केलें,

* कल्हन याची राजतरंगिणी, तरंग १.

आणि तेणेंकरून प्रियेच्या स्तनास राजाचे पाय लागल्याबद्दल जो त्यास राग आला होता तो शांत झाला.

जयपिर या राजानें सिंहलद्वीपास आपला वकील पाठविल्याविषयीं चांगलें प्रमाण आहे. यावरून त्याच्या वेळेस समुद्रपर्यटन नेहमी करीत असत या गोष्टीविषयीं हा आणखी अधिक पुरावा मिळाला. लिहिलेलें प्रमाण असें:—

**सांधिविग्रहिकः सोऽथ गच्छन् पोतच्युतोऽम्बुधौ ।**
**प्राप पारं तिमिग्रासात्तिमिमुत्पाट्य निर्गतः ॥ ५०३ ***

"तो वकील जातअसतां गलबतांतून समुद्रांत पडला, त्यास माशानें गिळिलें होतें. परंतु माशाचें शरीर फाडून तो बाहेर पडला"

काश्मीरचा राजा मातृगुप्त यानें सन्यासग्रहण केलें होतें असें आढळतें. तें असें:—

**अथ वाराणसीं गत्वा कृतकाषायसंग्रहः ।**
**सर्वं सन्यस्य सुकृती मातृगुप्तोऽभवद्यतिः ॥ + ३२२.**

त्यानंतर मातृगुप्त राजानें सर्व ऐहिक गोष्टींचा त्याग करून काशीक्षेत्रीं गमन केलें आणि काषायवस्त्र परिधान करून सन्यास अथवा चतुर्थाश्रम घेतला." ‡

विक्रम संवत्सराच्या १०१८ व्यावर्षीं सुवस्तु नांवाच्या राजानें शिवालय बांधून त्यांत हर्षदेव नांवानें शिवस्थापना केली. त्या शिवालयांत भिंतीवर खोदीव लेख आहे, त्यांत असें स्पष्ट लिहिलें आहे कीं, सुवस्तु यानें यावज्जीव ब्रह्मचर्य व्रत पाळिलें. तें असें:—

* कल्हन याची राजतरंगिणि, तरंग ४. + राजतरंगिणी, तरंग ३.
‡ हल्लीं सन्यासाश्रम येणें हिंदुस्थानाच्या सर्व भागांत चालू आहे.

आजन्मब्रह्मचारी दिगमलवसनः संयतात्मा तपस्वी
श्रीहर्षाराधनैकव्यसनशुभमतिस्त्यक्तसंसारमोहः ।
आसीद्यो लब्धजन्मा नवतरवपुषां सत्तमः श्रीसुवस्तु
स्तेनेदं धर्मवित्तैः सुघटितविकटं कारितं हर्षहर्म्यम् ॥ *

"सुवस्तु हा यावज्जीव ब्रह्मचारी होता, व तसाच दिगंबर, जितेंद्रिय, तपस्वी, श्रीहर्षाचा महान् भक्त, संसार संबंधी सर्व मोह सोडलेला, मनुष्य जन्माचें सार्थक करणारा, आणि अत्यंत सुरूप असा होता. त्यानें हें मोठें विस्तीर्ण व सुंदर असें हर्षदेव नामक शिवमूर्तीचें देवालय बांधिलें."

आसीन्नैष्ठिकरूपो यो दीप्तपाशुपतव्रतः । *

"त्यानें यावज्जीव ब्रह्मचर्य व्रताचें आचरण केलें, आणि तो पूर्ण शैव होता."

या सर्व गोष्टींवरून असें स्पष्ट दिसतें कीं, अश्वमेध, दूरच्या तीर्थांची यात्रा, अग्निप्रवेश, सन्यासग्रहण, समुद्रपर्यटन, बहुत वर्षें पर्यंत ब्रह्मचर्य, आणि विवाहित स्त्रीचा पुनर्विवाह हे धर्म कलियुगांत आचरण्यांत आहेत. कलियुगामध्यें प्राचीन काळच्या लोकांस शास्त्रांचें ज्ञान व त्यांची त्यांजवर निष्ठा हीं दोन्ही आतांच्या पेक्षां अधिक होतीं असें अनुमान करण्यास तिलप्रायही हरकत नाहीं. तरी आदिपुराणादि ग्रंथस्थ निषेध न मानितां अश्वमेध, अग्निप्रवेश इत्यादि गोष्टी ते करीत आले. यावरून असा सिद्धांत उघड होतो कीं, जे आचार स्मृतींस मान्य असून केवळ पुराणांनेंच निषिद्ध केले आहेत त्यांचें आचरण प्राचीन काळचे हिंदु लोक खुशालपणें करीत होते. आदित्य पुराणांत सांगितलें आहे कीं:—

---

* एशियाटिक सोसेटीचें जर्नल, जुलै १८३५, याचें ३७८ वें पृष्ठ पाहा.

**एतानि लोकगुप्त्यर्थं कलेरादौ महात्मभिः ।**

**निवर्त्तितानि कर्म्माणि व्यवस्थापूर्व्वकं बुधैः ॥**

"लोक संरक्षणार्थ हीं (अश्वमेधादि) कर्मे कलियुगाच्या आरंभीं, विद्वान व महात्मे अशा पुरुषांनीं विचार करून बंद केलीं."

आणि विद्वान व महात्मे अशा पुरुषांनीं जें म्हटलें त्यास दार्ढ्य आणण्याकरितां असें लिहिलें आहे कीं,

**समयश्चापि साधूनां प्रमाणं वेदवद्भवेत् ।**

"साधूंनीं केलेला नियम वेदा सारखाच प्रमाणभूत होय." हें वचन जागरूक असतांही पुराणस्थ निषेधाकडे अगदींच लक्ष न देऊन अश्वमेधादि कृत्यें प्राचीनकाळचे लोक धडका करीत आले, त्यावरून हे निषेध ते मानीत नव्हते यांत अगदीं संशय नाहीं. दत्तक व औरस या दोन प्रकारच्या पुत्रांखेरीज इतरप्रकारच्या पुत्रांचें पुत्रत्वेंकरून परिग्रहण करण्यास आदित्यपुराणांत निषेध आहे, परंतु काशीक्षेत्रांतल्या व त्याच्या आसपासच्या मुलखांतल्या लोकांत कृत्रिमपुत्राचें परिग्रहण करण्याचा संप्रदाय चालू आहे; आणि याच कारणास्तव नंदपंडितानें आपल्या दत्तकमीमांसेमध्यें असें लिहिलें आहे कीं,

**दत्तपदं कृत्रिमस्याप्युपलक्षणम् । औरसः क्षेत्रजश्चैव दत्तः कृत्रिमकः सुत इति कलिधर्म्मप्रस्तावे पराशर स्मरणात् ।**

"औरस पुत्र न झाल्यास दत्तकाप्रमाणें कृत्रिम पुत्रही घ्यावा ; कारण, पराशरानें असें लिहिलें आहे कीं, कलि-

युगांत औरस, दत्तक व कृत्रिम हे तीन प्रकारचे पुत्र कायदेशीर आहेत. ”

ह्मणजे आदित्यपुराणस्थ निषेधानुरोधेंकरून कलियुगांत औरस व दत्तक हे दोनच प्रकारचे पुत्र ग्राह्य आहेत तरी पराशरानें कलिधर्मांत कृत्रिम पुत्राचें ग्रहण करण्याविषयीं आज्ञा दिली आहे त्यावरून तोही सशास्त्र आहे; आदित्यपुराणांत दूरच्या यात्रेचा निषेध आहे. परंतु बहुत लोक हल्लीं दूरच्या यात्रा करतात हें सर्वांस माहीत आहे. ब्राह्मणास मरणांत प्रायश्चित्ताचा निषेध आहे त्याचें कधींच कोणीं पालन केलें नाहीं. वादाविवादांत बौद्ध लोकांच्या मताचें खंडन करून वैदिक धर्माची स्थापना करणारा जो महाप्रख्यात उदयनाचार्य त्यानें अग्निप्रवेश केला. अगदीं आलीकडे एक प्रसिद्ध पुरुष, कैलासवासी शाम चरण बनार्जिया यानें, सर्व पापाच्या प्रायश्चिताकरितां, काशीस्थ पंडितांच्या अनुमतानें, देहांतप्रायश्चिताच्या संकल्पानें आमरणांत आहार वर्ज केला होता.

कलियुगांत अश्वमेध याग करण्याविषयीं पराशरानें आज्ञा दिली आहे आणि कलियुगांतच निरनिराळ्या काळच्या राजांनीं तो केल्याविषयींचीं प्रमाणें आहेत, त्याअर्थीं अश्वमेध याग इतर युगांतल्याप्रमाणें कलियुगांतही करावा असें होतें. अशौच काळाचा संक्षेप करणें हें पराशर संहितेमध्यें कलिधर्मांत सांगितलें आहे तेव्हां तो कलिधर्म आहे याविषयीं संशयाचा लेशही नाहीं. अर्वाचीनकाळचे ब्राह्मण अशौच काळाचा संक्षेप करतांना आढळत नाहींत, याचें कारण

इतकेंच कीं, तो संक्षेप करण्याचा विधि पराशरानें जे निरंतर अग्निहोत्री व वेदाध्यायी आहेत त्यांसच उद्देशून सांगितला आहे. तो असाः—

**एकाहात् शुध्यते विप्रो योऽग्निवेदसमन्वितः ।**

**त्र्यहात् केवलवेदस्तु द्विहीनो दशभिर्दिनैः ॥**

"प्रत्यहीं होमहवन व वेदाध्ययन हीं दोन्ही करणारा ब्राह्मण अशौचापासून एका दिवसानें मुक्त होतो. केवळ वेदाध्ययन करणारा ब्राह्मण तीन दिवसांनीं मुक्त होतो. होमहवन न करणारा व वेदाध्ययनही न करणारा ब्राह्मण दहा दिवसांनीं मुक्त होतो."

आलीकडे रोजचें होमहवन व वेदाध्ययन हीं प्रचारांतून अगदीं बुडत चाललीं त्यामुळेंच अशौचकाळाचा संक्षेप करण्याचाही संप्रदाय मागें पडला. शूद्रजातीपैकीं दास नापित, गोपाल इत्यादिकांनीं दिलेल्या अन्नाचें भक्षण करणें हें पराशरसंहितेंत कलिधर्मांमध्यें सांगितलें आहे त्यापक्षीं तो कलिधर्म आहेच यांत अगदीं संशय नाहीं. दासादिकांनीं दिलेलें भक्ष्य पराशरसंहितेंत सांगितल्याप्रमाणें कलियुगांत खाण्यास मोकळीक आहे असें ह्मणतां तर वरिष्ठ जातींतले लोक ( ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ) यांस त्यांचें अन्न खाण्यास मोकळीक आहे काय ? असा प्रश्न कोणी करील. या प्रश्नास माझें उत्तर असें आहे कीं, त्यांस मोकळी आहेच व ते सामान्यतः खातही असतात. पराशरानें ज्या वचनांत ही मोकळीक दिली आहे त्याचा व त्याच्यापूर्वींच्या

दोन वचनांचा उद्देश कोणता आहे या गोष्टीचा चांगला विचार केला असतां आमचे प्रतिपक्षीही हें उत्तर मान्य करतील यांत संशयच नाहीं. तें असें:—

**शुष्कान्नं गोरसं स्नेहं शूद्रवेश्मन आगतम् ।**
**पक्कं विप्रगृहे पूतं भोज्यं तन्मनुरब्रवीत् ।**

"कोरडें (न शिजवलेलें) अन्न गोरस (दूधवैगेरे) आणि तेल, हे पदार्थ शूद्राच्या घरून आले असल्यास ब्राह्मणाच्या घरीं शिजवले असतां ते शुद्ध होतात, आणि ते भक्षण्याविषयीं मनूनें मोकळीक दिली आहे."

या वचनाचा अर्थ असा आहे कीं, शूद्रानें ब्राह्मणास तांदूळवैगेरे दिले असतां ब्राह्मणानें ते घेऊन आपल्या घरीं आणून शिजवून खुशाल खावे. त्यास तत्प्रयुक्त दोष अगदीं लागणार नाहीं. यावरून असें अनुमान होतें कीं, शूद्राच्या घरीं शिजवून मग खाल्लें असतां त्यास दोष लागेल.

**आपत्काले तु विप्रेण भुक्तं शूद्रगृहे यदि ।**
**मनस्तापेन शुध्येत द्रुपदां वा शतं जपेत् ॥**

"आपत्कालीं ब्राह्मणानें शूद्राच्या घरीं भोजन केलें असतां तो पश्चात्तापानें अथवा द्रुपद मंत्राचा शंभर जप केल्यानें शुद्ध होतो."

या वचनावरून असें स्पष्ट दिसतें कीं, आपत्तिकाळीं शूद्राच्या घरीं अन्न शिजवून खाल्लें असतां ब्राह्मणास मोठासा दोष लागत नाहीं. यास्तव असें अनुमान होतें कीं, आप-

त्तिकाळाखेरीज इतरकाळीं शूद्राच्या घरीं शिजवून खाणें हें दोषावह आहे.

दासनापितगोपाल कुलमित्रार्द्धसीरिणः ।
एते शूद्रेषु भोज्यान्ना यश्चात्मानं निवेदयेत् ॥

"शूद्र जातीपैकीं दास, नापित, गोपाल, कुलमित्र आणि अर्धसीरी या पोटजाती व आपणाकडे साह्यासाठीं येणारे पुरुष यांचें अन्न ( ह्मणजे यांनीं दिलेलें तांदूळ वगैरे धान्य) यांच्याच घरीं शिजवून खाण्यास चिंता नाहीं."

या वरील तीन वचनांवरून असें स्पष्ट दिसतें कीं, शूद्रानें दाणे, तांदूळ इत्यादि कोरडें धान्य दिलें असतां तें देखील ब्राह्मण जर त्या शूद्राच्या घरीं शिजवून अथवा करून खाईल तर त्यानें तें शूद्राचें अन्न खाल्लेंसें होतें; शूद्रानें दिलेलें तेंच धान्य ब्राह्मण आपल्या घरीं आणून शिजवून खाईल तर तें शूद्रान्न होत नाहीं. तथापि आपत्काळीं तेंच धान्य शूद्रानें दिलें असून त्याच्या घरीं शिजवून खाल्लें असतां चालतें. परंतु दास, नापित, गोपाल इत्यादिकांनीं दिलेलें धान्य आपत्कालीं किंवा अन्यकाळीं त्यांच्या घरीं शिजवून खाण्यास प्रत्यवाय नाहीं.

तर हें असलें शूद्राचें अन्न घेण्यास काय चिंता आहे यांचा विचार आमच्या वाचणाऱ्यांनीं करावा. शूद्रान्न ( शूद्राचें अन्न ) या शब्दाचा अर्थ शूद्रानें शिजवलेलें अन्न असा कोणी समजले आहेत. पण या ठिकाणीं या शब्दाचा अर्थ असा होतच नाहीं. असा अर्थ असता तर आ-

दित्य पुराणांत *शूद्रांपैकीं दास, नापित, इत्यादिकांचें अन्न खाण्याचा निषेध सांगून लागलाच ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांचें अन्न शूद्रानें शिजवण्याचा निषेध सांगितला आहे तो सांगितला नसता. एका मागून एक सांगितलेल्या दोन निषेधांपैकीं दुसरा निषेध शूद्रानें अन्न शिजविण्याविषयींच स्पष्ट आहे तेव्हां पहिला निषेध अर्थांत न शिजवलेल्या अन्नाविषयींच आहे हें अगदीं उघड आहे. दुसरें असें आहे कीं, शूद्राचें तांदूळ वगैरे धान्य हें शास्त्रांत शूद्रान्नच मानिलें आहे. तें असें:—

आमं शूद्रस्य पक्वान्नं पक्वमुच्छिष्टमुच्यते ।+

" शूद्राचें न शिजवलेलें धान्य शिजवल्या प्रमाणें होय आणि शिजवलेलें अन्न उच्छिष्ट अन्नाप्रमाणें होय."

मागें शूद्रान्न या शब्दाचा जो अर्थ केला आहे तोच, स्मार्त्तभट्टाचार्य रघुनंदन याचा त्या विषयावर ग्रंथ आहे त्यावरूनही कायम होतो. तो असा:—

आममन्नं दत्तमपि भोजनकाले तद्गृहावस्थितं शूद्रान्नं ।
तथाचांगिराः

---

* शूद्रेषु दासगोपालकुलमित्रार्द्धसीरिणाम् ।
भोज्यान्नता गृहस्थस्य तीर्थसेवातिदूरतः ॥
ब्राह्मणादिषुशूद्रस्यपक्वतादिक्रियापिच ।

"गृहस्थाश्रमी द्विजानें, शूद्रांपैकीं दास, गोपाळ, कुळमित्र आणि अर्धसीरी या जातींनीं दिलेलें अन्न खाणें; दूरचीं तीर्थ यात्रा करणें; ब्राह्मणाचें अन्न शूद्रानें शिजवणें;" (या गोष्टी कलियुगांत निषिद्ध आहेत.)

+ तिथितत्व. दुर्गापूजा तत्व.

शूद्रवेश्मनि विप्रेण क्षीरं वा यदि वा दधि ।
निवृत्तेन न भोक्तव्यं शूद्रान्नं तदपि स्मृतम् ॥

निवृत्तेन शूद्रान्नान्निवृत्तेन । अपि शब्दात् साक्षात् घृततंडुलादि । स्वगृहागते पुनरंगिराः

यथा यतस्ततो ह्यापः शुद्धिं यान्ति नदीं गताः ।
शूद्राद्विप्रगृहेष्वन्नं प्रविष्टंतु सदा शुचि ॥

प्रविष्टे ऽपि स्वीकारापेक्षामाह पराशरः

तावद्भवति शूद्रान्नं यावन्न स्पृशति द्विजः ।
द्विजातिकरसंस्पृष्टं सर्वं तद्भविरुच्यते ॥

स्पृशति गृण्हातीति कल्पतरुः । तच्च संप्रोक्ष्य ग्राह्यमाह विष्णुपुराणं.

संप्रोक्षयित्वा गृण्हीयात् शूद्रान्नं गृहमागतं ।

तच्च पात्रान्तरेण ग्राह्यमाहांगिराः

स्वपात्रे यच्च विन्यस्तं दुग्धं यच्छति नित्यशः ।
पात्रान्तरगतं ग्राह्यं दुग्धं स्वगृह आगतं ॥

एतेषु स्वगृह आगतस्यैव शुद्धत्वं तद्गृहगतस्य शूद्रान्नदोषभागित्वं प्रतीयते ।+

"शूद्रानें कोरडें धान्य दिलें तरी तें त्याच्या घरीं (शिजवून) खाल्लें असतां तें शूद्रान्नच होतें. कारण, अंगिरा यानें असें ह्मटलें आहे कीं, 'ज्या ब्राह्मणानें शूद्रान्न सोडलें आहे त्यानें शूद्राच्या घरीं दूध किंवा दहीं देखील खाऊं नये. कारण, तेंही शूद्रान्नच होय.' न शिजविले-

+ आन्हिक तत्व.

लें अन्न घरीं आणण्याविषयीं अंगिरा यानें पुनः असें ह्मटलें आहे कीं, 'कोठूनही पाणी आलें तरी नदीस मिळालें ह्मणजे शुद्ध होतें तसेंच शूद्राच्या घरचें न शिजवलेलें अन्न ब्राह्मणाच्या घरांत आलें ह्मणजे लागलेंच शुद्ध होतें.' पराशरानें ह्मटलें आहे कीं, शूद्रान्न ब्राह्मणाच्या घरांत आलें तरी ब्राह्मणानें त्याचा स्वीकार केल्या नंतरच तें शुद्ध होतें. तें असें, 'ब्राह्मण त्याच्या अन्नाचा स्वीकार करीपर्यंत तें शूद्रान्नच राहतें, त्याच्या हस्तस्पर्शानें तें पवित्र होतें.' विष्णुपुराणांत असें ह्मटलें आहे कीं, शूद्रान्नाचा स्वीकार करणें तो तें धुवून अथवा प्रोक्षण करून मग करावा. तें असें, 'शूद्रान्न कोणा एखाद्याच्या घरीं आलें असतां तें प्रोक्षून मग स्वीकारावें.' अंगिरायानें असें ह्मटलें आहे कीं, शूद्रान्न ज्या पात्रांत आणलें असेल त्याहून निराळ्या पात्रांत घालून तें घ्यावें. तें असें, 'शूद्रानें दूध अथवा दहीं आपल्या भांड्यांत घालून कोणाएखाद्याच्या घरीं आणून त्यास फुकट दिलें असतां घेणारानें तें दुसऱ्या भांड्यांत घालून घ्यावें.' या पदार्थांपैकीं जे द्विजाच्या घरीं येतात तेच शुद्ध आणि शूद्राच्या घरीं असल्यास तेच शूद्रान्न ह्मणून अशुद्धच होत, असें यावरून सिद्ध होतें."

या सर्व विचारांवरून असें उघड सिद्ध होतें कीं, अश्वमेधादिकृत्यें कलियुगांतील धर्म नाहींत हा जो निर्मूल ग्रह तो दृढ धरून त्यावरून, ज्या अर्थीं हे कलिवर्ज्य धर्म पराशरसंहितेंत सांगितले आहेत त्याअर्थीं पराशरानें केवळ कलि-

धर्मच सांगितले आहेत असें नाहीं; तर इतर युगांतील धर्मही सांगितले आहेत; तेव्हां पराशरसंहिता फक्त कलियुगांत आचरावयाच्या धर्मांचीच प्रतिपादक नव्हे, असा सिद्धांत करणें कोणत्याही प्रकारें सयुक्तिक नव्हे. तर ती केवळ कलिधर्मप्रतिपादकच आहे.

---

## अध्याय ७वा.

( मूळ ग्रंथांतील अध्याय १५वा. )

### मनुसंहितेंत चार युगांतील निरनिराळ्या धर्मांचें पार्थक्यानें विवेचन केलें नाहीं.

पहिल्या भागामध्यें, धर्मशास्त्रत्वें करून ग्राह्य असे ग्रंथ कोणते या गोष्टीचा याज्ञवल्क्याच्या मताप्रमाणें विचार करितांना मीं लिहिलें आहे तें असें:—सर्व धर्मशास्त्रांत सांगितलेले धर्म सर्व युगांत आचरावे किंवा युगभेदेंकरून त्यांची कांहीं व्यवस्था आहे, या विषयीं मनुस्मृति पुढें लिहिल्या प्रमाणें आहे:—

**अन्येकृतयुगे धर्मास्त्रेतायां द्वापरेऽपरे ।**
**अन्ये कलियुगे नृणां युगऱ्हासानुरूपतः ।**

"कृतयुगापासून कलियुगापर्यंत मनुष्याची शक्ति कमी कमी होत जाते; तिच्या प्रमाणानें कृतयुगांतले धर्म निराळे, त्रेतायुगांतले निराळे, द्वापारयुगांतले निराळे आणि कलियुगांतले निराळे."

तर आतां कलियुगांतल्या लोकांनीं धर्म कोणते आचरावे? मनूनें फक्त निरनिराळ्या युगांत निरनिराळे धर्म आहेत इतकेंच सांगितलें आहे. पण ते निरनिराळे धर्म कोणते ते सांगितले नाहींत. तो विवेक फक्त पराशरसंहितेंत केलेला आढळतो.

हा लेख कितीएक प्रतिपक्ष्यांस बरा न वाटून त्यांनीं मला उद्देशून असें लिहिलें आहे कीं, " निरनिराळ्या युगांत आचरावयाचे निरनिराळे धर्म मनुस्मृतींत पार्थक्यें करून सांगितले नाहींत असें हा ( मी ) कोणत्या आधारावरून ह्मणतो. 'मनुष्याच्या शक्तीचा युगपरत्वें करून ऱ्हास होतो इ० अर्थाचें एक फुटकळ वाक्य पाहूनच यानें आपले दोन्ही डोळे घट्ट मिटून घेतले ह्मणावें काय ? यानें स्वतः लिहिलेल्या स्मृतीच्या पुढच्याच स्मृतींत, कोणत्या युगांत कोणते धर्म करावयाचे ते मनूनें सांगितले आहेत; पण ती स्मृति यानें कशी ती मुळींच पाहिली नाहीं.

**तपः परं कृतयुगे त्रेतायां ज्ञानमुच्यते ।**
**द्वापरे यज्ञमित्याहुर्दानमेकं कलौ युगे ॥**

'सत्य युगांतील धर्म तपश्चर्या, त्रेतायुगांतील धर्म ईश्वरीय ज्ञान, द्वापारयुगांतील धर्म यज्ञ आणि कलियुगांतील धर्म फक्त दान या प्रमाणें ह्मटलें आहे."

आमच्या प्रतिपक्ष्यांच्या या वरील ह्मणण्यांतला अभिप्राय असा दिसतो कीं, मनूनें, "अन्येकृतयुगेधर्माः" या स्मृतीमध्ये निरनिराळ्या युगांत निरनिराळे धर्म आहेत असें सांगून तिच्याच पुढच्या स्मृतीमध्यें ते निरनिराळे धर्म कोणते ते त्यानें

सांगितले आहेत असें त्यांस खास वाटतें. आणि त्यावरून मग अर्थात "मनुसंहितेंत निरनिराळ्या युगाचे निरनिराळे धर्म सांगितले नाहींत" असें जें मीं लिहिलें तो केवळ प्रमादच होय असा त्यांनीं सिद्धांत केला. यावर माझें ह्मणणें असें आहे कीं, हा त्यांचा सिद्धांत सर्वथा युक्तिविरुद्ध आहे. याविषयीं बारीक रीतीनें विचार केला असतां असें साफ दिसतें कीं, निरनिराळ्या युगांत निरनिराळे धर्म आहेत असें पूर्वींच्या स्मृतींत लिहितांना जे विशेष धर्म मनूस विवक्षित आहेत तेच त्यानें पुढच्या स्मृतींत सांगितले आहेत, हें आमच्या प्रतिपक्ष्यांचें ह्मणणें कांहीं केलें तरी त्यांस कधींही सिद्ध करतां येणार नाहीं. आणखीं दुसरें असें कीं, पुढच्या स्मृतीचा त्यांनीं जो अर्थ केला आहे तो बरोबर नाहीं. यास्तव वाचणारांस या गोष्टीचा निर्णय करितां यावा ह्मणून दोन्ही स्मृति त्यांच्या वास्तविक अर्थासहित खालीं लिहितों.

**अन्ये कृतयुगे धर्मा स्त्रेतायां द्वापरेऽपरे ।**
**अन्ये कलियुगे नृणां युगऱ्हासानुरूपतः ।**

"कृतयुगापासून कलियुगापर्यंत मनुष्याची शक्ति कमी कमी होत जाते; तिच्या प्रमाणानें कृतयुगांतले धर्म निराळे, त्रेतायुगांतले निराळे, द्वापारयुगांतले निराळे आणि कलियुगांतले निराळे."

**तपः परं कृतयुगे त्रेतायां ज्ञानमुच्यते ।**
**द्वापरे यज्ञमित्याहुर्दानमेकं कलौ युगे ॥**

"सत्ययुगांतील मुख्य धर्म तपश्चर्या, त्रेतायुगांतील मुख्य-

धर्म ईश्वरीय ज्ञान, द्वापार युगांतील मुख्य धर्म यज्ञयाग आणि कलियुगांतील मुख्यधर्म दान या प्रमाणें ह्मटलें आहे."

आतां भिन्न भिन्न युगांत भिन्न भिन्न धर्म आहेत असें पूर्वीच्या स्मृतींत सांगून तिच्याच पुढच्या स्मृतींत ते भिन्न भिन्न धर्म मनूनें सांगितले आहेत किंवा काय याचा निकाल आमच्या वाचणारांनीं करावा. पूर्वींच्या स्मृतींत भिन्न भिन्न युगांतले धर्म भिन्न भिन्न आहेत असें सांगून पुढच्या स्मृतींत प्रत्येक युगांतील मुख्य मुख्य धर्म मात्र सांगितले आहेत. पूर्वींच्या स्मृतींत जे भिन्न धर्म आहेत ह्मणून सांगितले आहेत तेच पुढच्या स्मृतींत सांगितले आहेत असें दिसत नाहीं. प्रत्येक युगांतला मुख्य धर्म सांगितला ह्मणजे प्रत्येक युगांतील सर्व धर्म सांगितले असें होत नाहीं. या शिवाय पूर्वींच्यास्मृतींत धर्म शब्दाचें "धर्माः" असें बहुवचन आहे. त्याचा अर्थ प्रत्येक युगांतील "सर्व धर्म" असा आहे. तेव्हां प्रत्येक युगांतला एक एक मुख्य धर्म सांगितला ह्मणजे तेवढ्यावरूनच त्या युगांतले सर्वच धर्म सांगितले असें कसें ह्मणता येईल? यास्तव पुढच्याच स्मृतींत भिन्न भिन्न युगांतील भिन्न भिन्न धर्म मनूनें सांगितले आहेत हें ह्मणणें अगदींच पळपळीत आहे.

माझ्या प्रतिपक्ष्यांनीं "कलियुगांतला धर्म फक्त दान करणे हाच होय" असें मागें ह्मटलें आहे. त्यावरून असें होतें कीं, उपोषण, भजन, देवाचें पूजनार्चन, यात्रा इत्यादि

कलियुगांतले धर्म नव्हेत. परंतु हें व्यावचनाच्या अर्थास अगदीं सर्वथा विरुद्ध आहे. यास्तव त्या स्मृतीचा वास्तविक अर्थ असा आहे कीं, तपश्चर्या इत्यादि धर्म सामान्यतः सर्वच युगांतले आहेत, आणि त्या त्या युगांत तो तो धर्म मुख्य आहे इतकेंच. पूर्वोक्त स्मृतींतील "पर" आणि "एक" हे शब्द तपश्चर्यादिक विशेष्यवाचक शब्दांचीं विशेषणें आहेत. या दोन्ही विशेषणांचा अर्थ कधीं " मुख्य " असा होतो व कधीं " एकच " असा होतो. आणि मला असें वाटतें कीं, आमच्या प्रतिपक्षांनीं त्या शब्दांचा दुसरा अर्थ घेतला आणि वर लिहिल्या प्रमाणें अशुद्ध व्याख्यान केलें. परंतु या स्मृतींत या दोन्ही शब्दांचा अर्थ मुख्य असा आहे, एकच असा नव्हे. कुल्लुक भट्टाच्या व्याख्येवरूनही असेंच दिसतें. तें असें:—

**यद्यपि तपःप्रभृतीनि सर्वाणि सर्वयुगेष्वनुष्ठेयानि तथापि सत्ययुगे तपः प्रधानं महाफलमिति ज्ञाप्यते, एवमात्मज्ञानं त्रेतायुगे, द्वापरे यज्ञः, दानं कलौ ।**

"तपश्चर्यादिक धर्म असे आहेत कीं, ते सर्वच प्रत्येक युगांत आचरावयाचे आहेत तरी, तपश्चर्या सत्ययुगांत मुख्य धर्म आहे, ह्मणजे सत्ययुगांत तपश्चर्या विशेष फलप्रद आहे; या प्रमाणेंच ईश्वरीय ज्ञान त्रेतायुगांत, यज्ञ याग द्वापारयुगांत आणि दान कलियुगांत, हे मुख्य धर्म आहेत."

---

# अध्याय ८ वा.

( मूलग्रंथांतील अध्याय २० वा. )

## वैधव्य पावलेल्या कन्येचें दान दुसऱ्या वरास तिच्या पित्यानें करावें.

कांहीं लोकांनीं अशी अडचण काढली आहे कीं, "विधवाविवाहांत विधवेचें दान ( कन्यादान ) कोणीं करावें ? बापानें एक वेळ एका वरास कन्येचें दान केलें ह्मणजे लागलेंच तिजवरील त्याचें स्वत्व अगदीं संपतें. मग तिजवर त्याची बिलकूल मालकी नाहीं, तेव्हां तो ती दुसऱ्या वरास कसा देऊं शकेल ?"

आमच्या देशांत विवाहाचे हल्लीं दोन प्रकार चालू आहेत, एक ब्राह्म आणि दुसरा आसुर, ह्मणजे एक कन्येचें दान आणि दुसरा तिचा विक्रय. "दान" व "विक्रय" या शब्दांचे दुसऱ्या सर्व ठिकाणीं जे अर्थ असतात तेच केवळ या ठिकाणीं नाहींत. सामान्यतः पाहिलें असतां ज्या वस्तूवर ज्याचें स्वत्व ह्मणजे मालकी आहे तोच तिचें दान अथवा विक्रय करूं शकतो; आणि एकवार त्यानें त्या वस्तूचें दान अथवा विक्रय केला ह्मणजे त्याची तिजवरील मालकी नाहींशी होते आणि अर्थात तिचें दान अथवा विक्रय त्यास पुनः करतां येत नाहीं. हा निर्बंध अनादिकालापासून जमीनजुमला, घरदार, वस्त्रपात्र, गुरूंढोर इत्यादिकांच्या दानाविषयीं व विक्रयाविषयींच लागू आहे.

आणि अशा पदार्थांच्या दानविक्रयांत व कन्येच्या दानविक्रयांत हा सारखेपणा मुळींच नाहीं. जमीनजुमल्या वगैरेविषयीं असें आहे कीं, ज्याची त्यांवर मालकी नाहीं त्यास ते देतां अथवा विकतां येत नाहींत. आणि त्यानें दिले किंवा विकले तर तें दान अथवा ती विक्री रद्द होते. परंतु कन्येच्या दानास हा नियम लागू नाहीं. विवाहांतील कन्येचें दान हें तशा प्रकारचें खरोखर दानच नव्हे. तर हें कांहीं अंशीं केवळ नांवाचें दान आहे. विवाहांत कन्या वरास देणें यास आमच्या शास्त्रकर्त्यांनीं कन्यादान असें ह्मटलें आहे. हा विवाह कोणीं ही कन्येचें दान केलें तरी होतो. आणि ज्या पुरुषाचें त्या कन्येवर अगदीं स्वत्व नाहीं त्यानें तिचें दान केलें असतां ही, ज्याचें तिजवर पूर्ण स्वत्व आहे असें मानतात त्यानें दान केल्या प्रमाणेंच होऊन तो विवाह अगदीं पुरा व कायम होतो. दुसऱ्या पदार्थांविषयीं पाहिलें असतां ज्या पदार्थावर ज्या मनुष्याचें स्वत्व नाहीं त्या पदार्थाचें दान त्या पुरुषाच्या हातून होत नाहीं. आणि कन्येचें दान केवळ स्वजातीच्या मनुष्यापासून ही होतें. तें असें:—

**पिता दद्यात् स्वयं कन्यां भ्राता वानुमतः पितुः ।**
**मातामहो मातुलश्च सकुल्यो बान्धवस्तथा ॥**
**माता त्वभावे सर्व्वेषां प्रकृतौ यदि वर्त्तते ।**
**तस्यामप्रकृतिस्थायां कन्यां दद्युः स्वजातयः ॥ ***

"कन्येचें दान स्वतः तिच्या पित्यानें करावें. किंवा

* उद्वाहतत्वामध्यें नारदसंहितेंतील उतारा आहे.

पित्याच्या आज्ञेनें तिच्या भावानें तिचें दान करावें. मातामहानें ह्मणजे कन्येच्या आईच्या बापानें, मामानें, कन्येच्या बापाच्या गोत्रजानें, अथवा सोयऱ्याधायऱ्या संबधी पुरुषानें तिचें दान करावें. यांपैकीं कोणीच नसल्यास आई जर नीट शुद्धीवर असेल तर तिनें आपल्या कन्येचें दान करावें, परंतु ती शुद्धीवर नसेल तर कन्येच्या जातवाल्यांनीं तिचें दान करावें."

आतां पाहा, जमीन जुमला वगैरे पदार्थांच्या दाना विषयीं जो नियम आहे तोच कन्येच्या दाना विषयीं असावा. ह्मणजे तिजवर ज्याचें स्वत्व आहे त्यानेंच तिचें दान करावें, असा आमच्या शास्त्रकर्त्यांचा अभिप्राय असता तर कन्येच्या जातवाल्या लोकांस तिचें दान करण्याचा अधिकार त्यांनीं कसा सांगितला असता? तरी कन्येवर कोणाचें तरी स्वत्व आहे असें जर मानिलेंच तर फक्त एक तिच्या बापाचें व आईचें मात्र असावें. दुसऱ्या कोणाचें ही तिजवर कोणत्या ही संबंधानें अगदींच स्वत्व नाहीं. जमीन जुमला वगैरे पदार्थांच्या दानाप्रमाणेंच कन्येचें दान ही, ज्याचें तिजवर स्वत्व असेल त्या मनुष्यानें करावें असाच नियम असता तर शास्त्रकर्त्यांनीं मातामह (आईकडचा अजा) इत्यादि पुरुषांस तिच्या दानाचा अधिकार सांगितला नसता. आणि तिच्या आईस तिच्या दानाचा अधिकार सांगितला तो सर्व संबंधी जनांच्या मागून सांगितला तो कसा सांगितला असता? तशा नियमानें पाहतां

बापाच्या मागून आईलाच अधिकार सांगावयाचा होता. वस्तुतः जमीनजुमला, गुरूंढोर वगैरे पदार्थांवर ज्याप्रकारची मनुष्याची मालकी असते त्याप्रकारची कन्येवर असतच नाहीं. जर असती तर पित्याला समजल्यावांचून व त्याच्या अनुमतावांचून त्याच्या कन्येचें दान विवाहांत दुसऱ्या कोणीं एखाद्यानें केलें असतें तर तें, तिजवर त्या दान करणाराची कांहीं मालकी नसल्यामुळें निखालस रद्दच झालें असतें. परंतु असें खचीत होत नाहीं. दुसऱ्यांच्या मुलींचीं कन्यादानें विवाहांत दुसरे लोक करितात अशीं उदाहरणें हमेषा घडत असतात. तर ते सर्व विवाह कायम कां होतात ? कन्येचा बाप दिवाणी कोर्टांत फिर्याद करून ज्या मनुष्याची त्या कन्येवर कांहींच मालकी नाहीं अशा मनुष्यानें केलेलें तिचें दान रद्द कां करवीत नाहीं ? एकाच्या जमीनजुमल्याचें किंवा गुरूढोराचें दान दुसऱ्यानें केलें असतां तें कायम होत नाहीं. दिवाणी कोर्टापुढें फिर्याद केली असतां तें रद्द होतें. यास्तव या सर्व गोष्टींवरून कन्येचें दान ह्मणजे केवळ नांवाचें दान आहे आणि तें कन्येवरील मालकीवर मुळींच नाहीं. याप्रमाणें जर कन्येचें दान तिजवरील मालकीवर नाहीं आणि तें दान केवळ नांवाचें असून शास्त्रकर्त्यांनीं तें केवळ विवाहाचें अंगभूत ह्मणून एक कर्म सांगितलें आहे; तर शास्त्रांत सांगितलेल्या पतीच्या मरणामुळें अथवा दुसऱ्या आपत्तींमुळें जो पुनर्विवाह करावयाचा त्यांत कन्ये-

चें दान करण्यास बापास काडीमात्र हरकत नाहीं. मागें लिहिलेल्या स्मृतींमध्यें कन्येच्या प्रथम विवाहांत तिचें दान करण्याचा अधिकार लिहिला आहे त्याप्रमाणेंच दुसऱ्यास्मृतींत कितीएक आपत्तींच्या प्रसंगीं करावयाच्या पुनर्विवाहांतही तिचें दान करण्याचा अधिकार लिहिला आहे. तो असाः—

**सतु यद्यन्यजातीयः पतितः क्लीबएव च ।**
**विकर्मस्थः सगोत्रो वा दासो दीर्घामयोऽपि वा ।**
**ऊढापि देया सान्यस्मै सहाभरणभूषणा ॥***

पाहा, एकदा विवाह झालेल्या कन्येचें रीतीप्रमाणें पुनः दान करून विवाह करण्याचा अधिकार सांगितला आहे. एकदां कन्येचें दान प्रथम विवाहांत झालें ह्मणजे पुनर्विवाहांत दुसऱ्यानदां तिचें दान होण्यास हरकत असती तर महान् ऋषि जो कात्यायन त्यानें नवरा पतित, नपुंसक, सदा रोगी इत्यादि प्रकारचा निपजला असतां तिचें दान दुसऱ्या वरास करण्याविषयीं स्पष्ट आज्ञा दिली आहे ती दिली नसती. आणखी या गोष्टीविषयीं केवळ आज्ञा आहे इतकेंच नाहीं. तर वैधव्य पावलेल्या कन्येच्या पुनर्विवाहांत तिचें दान बापानें केल्याविषयीं धडधडीत प्रमाणही आहे. तें असेंः—

---

* अर्थ ३७ व्या पृष्ठावर पाहावा.

अर्जुनस्यात्मजः श्रीमानिरावान्नाम वीर्यवान् ।
सुतायां नागराजस्य जातः पार्थेन धीमता ॥
ऐरावतेन सा दत्ता ह्यनपत्या महात्मना ।
पत्यौहते सुपर्णेन कृपणा दीनचेतना ॥*

ज्याअर्थी मागें सिद्ध केल्याप्रमाणें, कन्येचें दान तिजवरच्या मालकीवर नाहीं, तर तें केवळ विवाहाचें अंगभूत एक कर्म आहे; ज्याअर्थी पुनर्विवाहाच्या प्रसंगीं विवाहाचे अंगभूत जे सर्व विधि व संस्कार तत्पूर्वक कन्येचें दान करण्याविषयीं शास्त्रांत स्पष्ट आज्ञा सांगितली आहे; आणि ज्याअर्थी वैधव्य पावलेल्या कन्येचें दान तिच्या पुनर्विवाहांत बापानें केल्याविषयीं स्पष्ट प्रमाण आहे; त्या अर्थी, कन्येचें एकदा दान केलें ह्मणजे बापाचें तिजवरील स्वत्व नाहींसें होतें, तेव्हां पुनर्विवाहामध्यें दुसऱ्या वेळेस तिचें दान करण्यास बापास अधिकार नाहीं, ही अडचण अगदीं पळपळीत आहे. एकंदरींत इत्यर्थ असा होतो कीं, शास्त्राप्रमाणें ज्या पुरुषांस प्रथम विवाहांत कन्येचें दान करण्याचा अधिकार आहे त्यांसच पुनर्विवाहांत तिचें दान करण्याचा अधिकार आहे.

---

* अर्थ ७७ व्या पृष्ठावर पाहावा.

# अध्याय ९वा.

(मूलग्रंथाचा अध्याय २२वा.)

## ज्या मंत्रांनीं प्रथम विवाहविधि करावयाचा त्याच मंत्रांनीं द्वितीय विवाहविधि ही करावयाचा.

कित्येक प्रतिपक्षी यांचें ह्मणणें असें आहे कीं, विधवाविवाहरूप संस्कार करण्यात मंत्र नाहींत यास्तव विधवाविवाह करतां येत नाहीं. ही अडचण अगदीं अप्रयोजक दिसते. प्रथम विवाहाच्या वेळीं ज्या मंत्रांचा ज्या क्रियांकडे विनियोग आहे ते मंत्र दुसऱ्या विवाहाच्या वेळीं लावतां येऊं नयेत असें त्या मंत्रांत कांहींच नाहीं, तेव्हां वरील अडचणीस मुळींच आधार नाहीं. यास्तव ज्या मंत्रांच्या द्वारा प्रथम विवाहसंबंध सशास्त्र होतो त्याच मंत्रांच्या द्वारा द्वितीय विवाहसंबंध ही सशास्त्र झालाच पाहिजे.

कांहीं आपत्तींच्या प्रसंगीं स्त्रियांचा पुनर्विवाह करण्याविषयीं मनु, विष्णु, वसिष्ठ, याज्ञवल्क्य, पराशर, नारद आणि कात्यायन यांनीं आज्ञा दिल्याचें मागें चांगल्या रीतीनें सिद्ध केलें आहे. प्रथम विवाहास जे मंत्र सांगितले आहेत तेच द्वितीय विवाहास लागू नसते तर वर लिहिलेल्या ऋषींनीं त्यास लागू असे निराळे मंत्र खचीत सांगितले असते; कारण, मंत्रांवांचून विवाहसंस्कार पूर्ण होतच नाहीं. परंतु असे निराळे मंत्र सांगितले नसून पहिल्या विवाहाचे मंत्र दुस-

त्यास लागू नसतील तर त्या ऋषींनीं दिलेली पुनर्विवाहाची आज्ञा सर्वथा असंगत होऊं लागेल. स्त्रीपुरुषांच्या केवळ लौकिक संबंधास विवाहसंस्कार ह्मणत नाहींत. तर तो संबंध, विवाहाविषयीं विशेष वाचानिक मंत्र आहेत त्यांनीं घडला पाहिजे. स्त्रियांचा पुनर्विवाह या शब्दाचा अर्थ, केवळ मंत्र विरहित स्त्रीचा पुरुषाशीं संबंध, असा असता तर त्या संबंधास आमच्या पूर्वोक्त शास्त्रकर्त्यांनीं "संस्कार" हा शब्द देखील लाविला नसता. तो असाः—

मनु ह्मणतोः—

**या पत्या वा परित्यक्ता विधवा वा स्वयेच्छया।**
**उत्पादयेत् पुनर्भूत्वा स पौनर्भव उच्यते॥** ९.१७५.
**सा चेदक्षतयोनिः स्याद्गतप्रत्यागतापि वा।**
**पौनर्भवेन भर्त्रा सा पुनः संस्कारमर्हति॥** ९.१७६.

"विधवा झाल्यानंतर अथवा पतीनें टाकून दिल्यानंतर दुसऱ्या पुरुषा बरोबर विवाह होऊन त्या विवाहसंबंधापासून स्त्रीस जो पुत्र होतो त्यास पौनर्भव ह्मणतात. तिला ऋतुप्राप्ति झाली नसेल अथवा ऋतुप्राप्तीच्या पूर्वीं नवऱ्यापासून जाऊन ऋतुप्राप्त्युत्तर पुनः त्याजकडे परत येईल तर तिचा पुनःसंस्कार केला पाहिजे."

वसिष्ठ ह्मणतोः—

**पाणिग्रहे मृते बाला केवलं मंत्रसंस्कृता।**
**साचेदक्षतयोनिः स्यात् पुनः संस्कारमर्हति॥** अ. १७.

" विवाह झाल्यानंतर जिचें कन्यात्व भग्न झालें नाहीं

(ह्मणजे जीस पतिस्पर्श झाला नाहीं) अशा स्त्रीचा पति मेला असतां तिचा पुनःसंस्कार करावा."

विष्णु ह्मणतोः—

**अक्षता भूयः संस्कृता पुनर्भूः** । अ. १५.

"विवाह झाल्यानंतर जी स्त्री पतीनें अस्पृष्ट अशी असून पुनः संस्काराप्रत पावते तीस पुनर्भू असें ह्मणतात."

याज्ञवल्क्य ह्मणतोः—

**अक्षता च क्षता चैव पुनर्भूः संस्कृता पुनः** । १.६७.

"विवाह झाल्यानंतर पतीचा स्पर्श झालेली अथवा न झालेली अशी जी स्त्री पुनः संस्काराप्रत पावते तीस पुनर्भू असें ह्मणतात."

तेव्हां ज्याअर्थी मनु, वासिष्ठ, विष्णु, याज्ञवल्क्य, पराशर व दुसरेही किती एक ऋषि इतक्या शास्त्रकर्त्यांनीं कांहीं आपत्तींच्या प्रसंगीं स्त्रियांस पुनर्विवाहाविषयीं अनुमोदन दिलें आहे; ज्याअर्थीं अशा विवाहास त्यांनीं पुनर्विवाहाचा "संस्कार" असें ह्मटलें आहे; ज्याअर्थीं संस्कार हा शब्द स्त्रीपुरुषांच्या अमंत्रक अतएव केवळ लौकिक अशा संबंधास मुळींच लावतां येत नाहीं; ज्याअर्थीं अशा विवाहापासून झालेली संतति त्यांनीं कायदेशीर वारसांत गणिली आहे; आणि ज्याअर्थीं अशा द्वितीय विवाह संस्काराबद्दल त्यांनीं दुसऱ्या मंत्रांची योजना केली नाहीं; त्याअर्थीं ज्या मंत्रांची योजना पाहिल्या विवाहसंस्कारांत होत असते त्यांचीच योजना दुसऱ्या विवाहसंस्कारांतही केली

पाहिजे. दुसरें असें कीं, स्त्रियांच्या दुसऱ्या विवाहास ते लागू पडूं नयेत असें त्या मंत्रांमध्यें कांहींच नाहीं, तेव्हां तेच लावण्यास हरकत ती कोणती ?

पुढें लिहिलेल्या मनुस्मृतीच्या आधारावरून प्रथमविवाहाचे मंत्र स्त्रियांच्या पुनर्विवाहास लागू पडणार नाहींत, असें कितीएक प्रतिपक्षी भांडतात.

**पाणिग्रहणिका मंत्राः कन्यास्वेव प्रतिष्ठिताः ।**
**नाकन्यासु क्वचिन्नृणां लुप्तधर्म्मक्रिया हि ताः॥८.२२६.**

" पाणिग्रहणविधायक मंत्र केवळ कन्यांस ( कन्यांच्या पाणिग्रहणास ) लागू आहेत; " अकन्यांस " ह्मणजे ज्यांचें कन्यात्व नष्ट झालें आहे अशा स्त्रियांस लागू नाहींत. कारण, त्या धर्माचरणापासून बहिष्कृत आहेत."

माझें असें ह्मणणें आहे कीं, वर लिहिलेल्या वचनांत " अकन्या " शब्देंकरून मनूस विधवा विवक्षित नाहींत; तर विवाहापूर्वींच पुरुषसंग होऊन ज्यांचें कन्यात्व नष्ट झालें आहे त्याच विवक्षित आहेत असें, " कारण, त्या धर्माचरणापासून त्या बहिष्कृत आहेत " या शेवटल्या वाक्यावरून अगदीं स्पष्ट होतें. विधवा धर्माचरणापासून बहिष्कृत आहेत असें एकाही हिंदूच्या तोंडांतून कधीं निघणारच नाहीं. आणि उलटें असें आहे कीं, पुनर्विवाह न करितां वैधव्यच पतकरून राहणाऱ्या स्त्रियांस सर्व आयुष्य धर्माचरणांतच घालविण्यास शास्त्रांत विधान केलें आहे.

# अध्याय १०वा.

(मूलग्रंथाचा अध्याय २३वा.)

## विवाहसंबंध करण्याविषयीं नवरा जितक्या मानानें बिजवरापेक्षां प्रथमवर चांगला तितक्याच मानानें नवरी द्वितीयविवाहाच्या पेक्षां प्रथमविवाहाची चांगली.

विधवाविवाहाविषयींच हा विचार चालला आहे त्या-पक्षीं अविवाहित कन्येबरोबर विवाह करावा असें पुढें लिहि-लेल्या याज्ञवाल्क्य वचनांत ह्मटलें आहे त्याचा विचार केला पाहिजेः—

**अविप्लुतब्रह्मचर्य्यो लक्षण्यां स्त्रियमुद्वहेत् ।**
**अनन्यपूर्विकां कांतामसपिण्डां यवीयसीम् ॥ ***

"ब्रह्मचर्य (ह्मणजे वेदाध्ययन करण्याच्या वेळची स्थिति) संपल्यावर पुरुषानें अविवाहित, सुलक्षण, मनास आवडणारी, आपणापेक्षां वयानें लहान, आणि सपिंडांतली नव्हे अशा कन्येशीं विवाह करावा."

या व याविषयावरील दुसऱ्या वचनांवरून आमचे प्रतिपक्षी विवाहित कन्येचा विवाह पुनः करूं नये, असें स्थापन करण्यास झटतात. परंतु मनु, याज्ञवल्क्य, विष्णु, वासिष्ठ आणि दुसरे स्मृतिकर्ते यांनीं आपआपल्या संहितांमध्यें कितीएक अडचणींच्या प्रसंगीं विवाहित स्त्रियांचा पुनर्विवाह करण्याविषयीं आज्ञा दिली आहे, त्यांच्या नियमांस विवाहित

---

* याज्ञवाल्क्य संहिता. १. ५२.

स्त्रियांचा पुनर्विवाह करूं नये हें ह्मणणें अगदीं विरुद्ध आहे. कारण, प्रतिपक्षी यांचें हें ह्मणणें कबूल केलें असतां वर लिहिलेल्या स्मृतिकर्त्यांची आज्ञा असंगत होते. वस्तुतः मागें लिहिलेल्या याज्ञवल्क्य वचनाचा अभिप्राय असा आहे कीं, पुरुषास नवीन विवाहसंबंध करणें असेल तेव्हां त्यानें विवाहित वधूपेक्षां अविवाहित वधूला प्राशस्त्य समजावें; ह्मणजे कन्या द्यावयाची असतां बिजवरापेक्षां प्रथम वर नवरा जसा प्रशस्त तसेंच हें ही होय. याज्ञवल्क्यस्मृतींत पुरुषानें अविवाहित कन्या वरावी ह्मणून जसें विधान केलें आहे तसेंच पुढें लिहिलेल्या बौधायनस्मृतींत कन्यादान प्रथमवरास करावें असें विधान केलें आहे.

**श्रुतशीलिने विज्ञाय ब्रह्मचारिणेऽर्थिने देया ॥†**

"वेदाध्ययनसंपन्न सद्गुणी आणि ज्ञाता अशा प्रथम वरास कन्या द्यावी."

यावरून बिजवर नवऱ्यास कन्यादान मुळींच निषिद्ध आहे असें अनुमान काढल्यास तें, बायको मेल्यानंतर, ती वांझ आहे असें समजल्यानंतर अथवा दुसऱ्या कितीएक अडचणींच्या प्रसंगीं पुरुषास पुनः लग्न करण्यास मोकळीक ज्या स्मृतींनीं दिली आहे त्यांशीं विरुद्ध होईल. हा जो सामान्यतः विरोध दिसतो त्याचा परिहार करण्याकरितां असा सिद्धांत केला पाहिजे कीं, या स्मृति फक्त कमी जास्त प्राशस्त्य दाखविणाऱ्या आहेत. अविवाहित व विवाहित

† उद्वाहतत्त्व आणि याज्ञवल्क्यदीपकलिका यांत हें वाक्य घेतलें आहे.

या कन्यांच्या विवाहाविषयीं ही असाच सिद्धांत केला पाहिजे. वास्तविक रीतीनें विचार करतां बिजवराबरोबर लग्न करणें स्त्रीस जसा मध्यम पक्ष, तसाच दुसऱ्या विवाहाच्या बायकोबरोबर लग्न करणें हा पुरुषास मध्यम पक्ष होय. यांत फरक कांहीं नाहीं.

स्मार्त्तभट्टाचार्य रघुनंदन यानें हाच सिद्धांत केला आहे. तो असाः—

**बौधायनः, श्रुतशीलिने विज्ञाय ब्रह्मचारिणेऽर्थिने देया। ब्रह्मचारिणे अजातस्त्रीसंपर्कायेति कल्पतरुयाज्ञवल्क्यदीपकलिके। जातस्त्रीसंपर्कस्य द्वितीयविवाहे विवाहाष्टकबहिर्भावापत्तेस्तदुपादानं प्राशस्त्यार्थमिति तत्वम्॥ ***

"बौधायन ह्मणतो—वेदाध्ययनसंपन्न, सद्गुणी आणि ज्ञाता अशा प्रथम वरास कन्या द्यावी. 'ब्रह्मचारिणे' याचा अर्थ, कल्पतरु व याज्ञवल्क्यदीपकालिका याग्रंथांत, ज्यास स्त्रीचा संपर्क झाला नाहीं अशा पुरुषास, असा केला आहे पण हा अर्थ अक्षरशः होतो. आणि हाच घेतला असतां कन्या केवळ प्रथम वरासच द्याव्या असें होईल आणि बिजवराच्या पुनर्विवाहाचा आठ प्रकारच्या विवाहांपैकीं एकांत ही समावेश होणार नाहीं. यास्तव प्रथमवर हें विशेषण देण्याचें बौधायनाचें तात्पर्य हेंच कीं, कन्यादान प्रथम वरास करणें हा उत्तम पक्ष होय."

---

* उद्वाहतत्व.

थोडासा विचार केला असतां असें लक्षांत येतें कीं, आमच्या शास्त्रकर्त्यांनीं स्त्रिया व पुरुष या दोघांविषयीं ही अशा बाबतींत एकसारखेच नियम ठरविले आहेत. ते असेः—कन्येचा निश्चय करण्यापूर्वी तिचें कुलशील पाहणें

+ अविप्लुतब्रह्मचर्यो लक्षण्यां स्त्रियमुद्वहेत् ।
अनन्यपूर्विकां कान्तामसपिण्डां यवीयसीम्॥५२.
अरोगिणीं भ्रातृमतीमसमानार्षगोत्रजाम् ।
पंचमात् सप्तमादूर्ध्वं मातृतः पितृतस्तथा ॥ ५३.
दशपूरुषविख्यातात् श्रोत्रियाणां महाकुलात् ।
स्फीतादपि न संचारिरोगदोषसमन्वितात् ॥ ५४.
एतैरेव गुणैर्युक्तः सवर्णः श्रोत्रियो वरः ।
यत्नात् परीक्षितः पुंस्त्वे युवा धीमान् जनप्रियः॥५५

"ब्रह्मचर्य ( ह्मणजे वेदाध्ययन करण्याच्या वेळची स्थिति ) संपल्यावर पुरुषानें अविवाहित, सुलक्षण, मनास आवडणारी, आपल्यापेक्षां वयानें लहान, सपिंडांतली नसलेली, असाध्य रोग नसलेली, भाऊ असलेली, सगोत्र किंवा सप्रवर नसलेली, मातृपक्षाकडून पांच आणि पितृपक्षाकडून सात यांहून अधिक पिढ्यांची अशी कन्या असेल ती बायको करावी. ज्याची प्रख्याति दहा पिढ्या आहे, ज्यांत वेदाध्ययन प्रत्यहीं होत आहे, जें मोठें नामांकित व संपत्तिमान आहे, असें कुल असलें तरी त्यांत जर संचारी (ह्मणजे एका पिढीपासून दुसऱ्या पिढीस होणारा असा एखादा ) रोग असला अथवा त्याला दुसरा एखादा कलंक असला तर त्यांतील कन्या करूं नये. जे गुण कन्येच्या अंगीं असावे ह्मणून सांगितले तेच गुण वराच्या अंगीं असले पाहिजेत; तो कन्येच्या जातीचा व प्रत्यहीं वेदाध्ययन करणारा असा असावा. याखेरीज त्याच्या पुरुषत्वाबद्दल फार बारकाईनें चौकशी केलेली असावी आणि तो तरुण, बुद्धिमान व लोकप्रिय असा असावा."

जसें आवश्यक आहे तसेंच वरास कन्या देण्याचा निश्चय करण्यापूर्वीं त्याचें कुलशील पाहणें आवश्यक आहे असा विधि आहे. विवाह झाल्या नंतर नवऱ्यास[1] संतुष्ट राखणें हा जसा बायकोचा धर्म आहे ह्मणून सांगितलें आहे, तसा-च बायकोस संतुष्ट राखणें हा नवऱ्याचा धर्म आहे ह्मणून सांगितलें आहे. व्यभिचारप्रयुक्त पातक जसें स्त्रीस सांगितलें आहे तसेंच पुरुषासही[2] सांगितलें आहे. एक बायको मेली अथवा वांझ निपजली वगैरे अडचणींच्या प्रसंगीं

---

[1] सन्तुष्टो भार्य्यया भर्ता भर्त्रा भार्या तथैवच ।
यस्मिन्नेव कुले नित्यं कल्याणं तत्र वै ध्रुवम् ॥ ३.६०.

"ज्या कुटुंबांत बायको नवऱ्यास संतुष्ट राखते व नवरा बायकोस संतुष्ट राखतो त्याचें निरंतर कल्याण असतें." मनु.

यत्रानुकूल्यं दंपत्योस्त्रिवर्गस्तत्र वर्धते ॥ १.७४.

"ज्या कुटुंबामध्यें नवरा बायको परस्परास खुष राखतात व परस्पराशीं प्रेमानें वागतात त्यांत धर्म, अर्थ, आणि काम हे तीन पुरुषार्थ वृद्धिंगत होतात." याज्ञवल्क्य.

[2] व्युच्चरंत्याः पतिं नार्य्या अद्यप्रभृति पातकम् ।
भ्रूणहत्यासमं घोरं भविष्यत्यसुखावहम् ।
भार्य्यां तथा व्युच्चरतः कौमारब्रह्मचारिणीम् ।
पतिव्रतामेतदेव भविता पातकं भुवि ॥

"पतीचा अतिक्रम करून व्यभिचार करणाऱ्या स्त्रीस आज पासून भ्रूण हत्येचें जें महाघोर पातक तें लागेल. आणि चांगल्या आचरणानें असणाऱ्या पतिव्रता स्त्रीचा अतिक्रम करून व्यभिचार करणाऱ्या नवऱ्यासही तेंच पातक लागेल." महाभारत, आदिपर्व. अध्याय. १२२.

दुसरी बायको करण्याविषयीं पुरुषास जशी आज्ञा दिली आहे तशीच एक नवरा मेला अथवा नपुंसक निपजला वगैरे अडचणींच्या प्रसंगीं दुसरा नवरा करण्याविषयीं बायकोसही आज्ञा दिली आहे. एकदा विवाह झालेल्या स्त्रीशीं पुनः विवाह करणें हा जसा पुरुषाला मध्यम पक्षाचा विवाह सांगितला तसाच एकदा विवाह झालेल्या पुरुषाशीं पुनः विवाह करणें हा स्त्रीलाही मध्यम पक्षाचाच विवाह सांगितला आहे.—परंतु पुरुष हा सर्वथा प्रबल पडला. तेव्हां तो आपणास ज्या गोष्टींचा अधिकार घेतो त्याच गोष्टींचा अधिकार गरीब बिचाऱ्या स्त्रिया अबला पडल्या ह्मणून त्यांस तो देण्यास इच्छीत नाहीं. त्यानें सर्व शास्त्रें आपल्या हातांत घेतलीं आहेत आणि त्यांचे अर्थ व व्याख्या आपल्या सोयीत पडतील तशा तो करितो; आपल्या स्वार्थपरबुद्धीमुळें व अन्यायामुळें स्त्रीजाति किती निकृष्ट स्थितीस येऊन पोहोचली आहे या विषयीं त्याच्या मनांत तिळप्रायही विचार येत नाहीं. अशा प्रकारच्या अन्यायांपासून हिंदुस्थानांतील अर्वाचीन काळच्या स्त्रियांस जीं दुःखें भोगावीं लागत आहेत तीं केवळ ह्रदय वेधकच आहेत. स्त्री जातीस विशेष सन्मान देणें व तीस उत्तम प्रकारें करून सुखी ठेवणें या गोष्टी या आमच्या देशांत अज्ञात आहेत ह्मटलें तरी चिंता नाहीं. आणखी उलटें असें ही आहे कीं, जे पुरूष आपणास शाहणे असें मानितात व ज्यांस दुसरे लोक ही शाहण्यांत गणतात तेही स्त्रियांची प्रस्तुतची निकृष्ट दशा आहे ती बरीच आहे असें मानितात.

मनूनें असें ह्मटलें आहे कीं,

पितृभिर्भ्रातृभिश्चैताः पतिभिर्देवरैस्तथा ।
पूज्या भूषयितव्याश्च बहु कल्याणमीप्सुभिः ॥ ३.५५
यत्र नार्य्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः ।
यत्रैतास्तु न पूज्यन्ते सर्व्वास्तत्राफलाः क्रियाः ॥ ३.५६.
शोचन्ति जामयो यत्र विनश्यत्याशु तत् कुलम् ।
न शोचन्ति तु यत्रैता वर्द्धते तद्धि सर्व्वदा ॥ ३.५७.
जामयो यानि गेहानि शपन्त्यप्रतिपूजिताः ।
तानि कृत्याहतानीति विनश्यन्ति समन्ततः ॥ ३.५८

"सुख व संपत्ति यांची इच्छा करणाऱ्या पित्यांनीं व भ्रात्यांनीं, आणि पतींनीं व दिरांनीं स्त्रियांस सन्मान द्यावा व उत्तम वस्त्रांनीं व आभरणांनीं त्यांस अलंकृत करावें. ज्या कुटुंबांत स्त्रियांस सन्मान मिळतो त्यांत देवता संतुष्ट अशा होऊन राहतात. परंतु ज्या कुटुंबांत सन्मान मिळत नाहीं त्यांत यज्ञयाग, तप, दान वगैरे सर्व क्रिया निष्फल होतात. ज्या कुळांत स्त्रिया दुःखित असतात तें कुल लवकर नाश पावतें. आणि ज्यांत स्त्रिया सुखी असतात त्यांत सुख व संपत्ति यांची सर्वदा वृद्धि होते. स्त्रियांस योग्य सन्मान न मिळाल्यामुळें त्या ज्या कुळांस शाप देतात. तीं सर्वथा नष्ट होतात."

स्त्रियांस सन्मान देण्याविषयीं जो हा शास्त्रार्थ वर लिहिला तो स्त्रियांच्या दुर्भाग्येंकरून लोकांत प्रायः अगदीं चालत नाहीं. आणि असा सर्वोत्कृष्ट शास्त्रार्थ मोडल्या मुळें घडणारे जे दुष्टपरिणाम ते लोकांत सर्वत्र धडधडीत दिसतच आहेत.

# अध्याय ११ वा.

(मूलग्रंथाचा अध्याय २४ वा.)

## शास्त्रापेक्षां रूढीचें प्रामाण्य बलवत्तर नव्हे.

विधवाविवाह शास्त्रसंमत नाहीं हें स्थापन करण्याकरितां प्रतिपक्षी यांनीं प्रमाणभूत ह्मणून जीं कांहीं वचनें लिहिलीं होतीं त्या सर्वांचा वास्तविक अर्थ व तात्पर्य हीं मीं यथामति पराकाष्ठेचा विचार करून सांगितलीं आहेत. आतां स्त्रियांच्या पुनर्विवाहाचा संप्रदाय चालू करण्याविषयीं जी एक हरकत प्रतिपक्षी यांनीं काढली आहे तिचें निवारण करतों. ते ह्मणतात कीं, विधवांचा विवाह शास्त्रास अनुसरून असला तरी तो देशाच्या रूढीस विरुद्ध आहे यास्तव तो चालू करूं नये. अशा प्रकारची हरकत कोणी तरी काढील हें जाणूनच वसिष्ठाचें वचन प्रथम भागांत लिहिलें आहे त्याचा अर्थ, रूढीपेक्षां शास्त्र हें बलवत्तर प्रमाण होय. परंतु एकच वचन असल्यास तो कांहीं मजबूत आधार नव्हे, असें त्यांचें मत असेलसें वाटतें, याकरितां त्याविषयीं दुसरीं प्रमाणें लिहितों तीं अशीं:—

**धर्मं जिज्ञासमानानां प्रमाणं परमं श्रुतिः ।**
**द्वितीयं धर्मशास्त्रंतु तृतीयं लोकसंग्रहः ॥***

"धर्म कोणता आहे हें जाणण्याची ज्यांची इच्छा असेल त्यांनीं असें समजावें कीं, श्रुति ह्मणजे वेद हे पहिल्या प्रतीचें प्रमाण, स्मृति ह्मणजे धर्मशास्त्र दुसऱ्या प्रतीचें, आणि रूढि ह्मणजे देशाचार हें तिसऱ्या प्रतीचें अशीं होत."

* महाभारत, अनुशासन पर्व.

यावरून साफ दिसतें कीं, रूढी हें अगदीं निकृष्ट प्रतीचें प्रमाण आहे आणि वेद व स्मृति हीं वरिष्ठ प्रतीचीं प्रमाणें आहेत.

**न यत्र साक्षाद्विधयो न निषेधाः श्रुतौ स्मृतौ।**
**देशाचारकुलाचारैस्तत्र धर्मो निरूप्यते ॥+**

"ज्या गोष्टीं विषयीं श्रुतींत अथवा स्मृतींत विधि व निषेध हीं दोन्ही सांगितलीं नाहींत त्या गोष्टीं विषयीं देशाचार व कुलाचार हे प्रमाणभूत समजावे."

यांत स्पष्ट सांगितलें आहे कीं, ज्या गोष्टींविषयीं श्रुतिस्मृतींमध्यें नियम सांगितले नाहींत त्यांविषयीं मात्र कायती रूढि प्रमाण धरावी, इतरांविषयीं नाहीं. आणखीं,

**स्मृतेर्वेदविरोधे तु परित्यागो यथा भवेत् ।**
**तथैव लौकिकं वाक्यं स्मृतिबाधे परित्यजेत् ॥‡**

"स्मृति वेदांस विरुद्ध असल्यास ज्याप्रमाणें त्या स्मृतीचा त्याग करावयाचा त्याप्रमाणेंच रूढि ही स्मृतींस विरुद्ध असल्यास त्या रूढीचा त्यागच करावयाचा."

तेव्हां शास्त्र आणि रूढि यांचा परस्पराशीं विरोध आल्यास रूढीचें अनुसरण करूं नये.

यावरून विधवांच्या विवाहाविषयीं शास्त्रांत स्पष्ट आज्ञा दिली असतां, तो देशरूढीस विरुद्ध आहे सबब चालू करूं नये, हें स्थापन करण्याचा प्रयत्न करणें हेंच शास्त्रकर्त्यांच्या मतांस व त्यांच्या नियमांस अगदीं धडधडीत विरुद्ध आहे.

---

+ स्कंदपुराण.

‡ ही स्मृति प्रयोग पारिजातामध्यें घेतली आहे.

# अध्याय १२ वा.

( मूलग्रंथाचा अध्याय २५ वा. )

## सिद्धांत.

आमच्या या हिंदुस्थान देशांतील अनाथ विधवांस व त्यांतही विशेषतः ज्यांचे प्रिय पति ज्यांस कामादि भयंकर श्वापदांनीं व्याप्त अशा या घोर अरण्यांत अगदीं अल्पवयांतच केवळ निराधार टाकून देऊन परलोकास चालते होतात अशांस, ह्मणजे बालविधवांस जीं दुःखें कंठावीं लागतात तीं किती आहेत व कशीं असह्य आहेत हें ज्यांस नेत्र व कर्ण हीं दोन इंद्रियें आहेत ते सर्व खरोखर जाणतील; आणि असल्या सर्व दुःखांचें शांवतन करणारा जो पुनर्विवाह त्याचा अधिकार त्या बिचाऱ्या अनाथ विधवांस दयार्द्र-हृदय शास्त्रकर्त्यांनीं दिला असून तो त्यांस नाहींसा करण्याचा जो आधुनिक निराधार संप्रदाय त्यापासून लोकांत किती अनर्थापात होत आहेत हेंही ते जाणतील. अहो सुज्ञ वाचणारानो, माझी हात जोडून तुह्मास अशी विनंती आहे कीं, या विषयाकडे अंतःकरण लावून शांतपणें याचा चांगला पूर्ण विचार करा आणि मग, आपल्या सर्व जनमान्य अशा शास्त्रकर्त्यांच्या नियमांचा सर्वथा अनादर करून या पुनर्विवाहप्रतिबंधाच्या दुष्ट चालीचे गुलाम होऊनच आपण राहावें; किंवा त्या दुष्ट चालीनें आपल्या मानेवर बसवलेलें-जूं फेकून देऊन व शास्त्राज्ञेवर भरंवसा ठेवून विधवाविवाहाचा संप्रदाय आपणामध्यें सुरू करावा आणि त्या बिचा

ऱ्या स्त्रियांच्या पूर्वोक्त दुःखाचा परिहार करण्याचें श्रेय संपादावें या विषयीं आपलें निष्पक्षपात मत बोला. वरील गोष्टीचा निर्णय करितांना आमच्या देशांतील चाली न बदलणाऱ्या अशा नाहींत हें मात्र तुह्मी पक्कें ध्यानांत ठेवलें पाहिजे. त्यांच्यांत कधींच कांहीं बदल झाली नाहीं असें कोणाच्यानेंही ह्मणवणार नाहीं. आणखी उलटें असें आहे कीं, आपल्या प्रस्तुत काळच्या कांहीं चाली आपल्या पूर्वजांच्या वेळच्या चालींशीं लावून पाहिल्या असतां आपण हल्लींचे हिंदू लोक त्या पूर्वजांपेक्षां अगदीं सर्वांशीं निराळे आहों असें वाटेल. ही गोष्ट खरी आहे हें समजण्यास एक उदाहरण बस आहे. प्राचीन काळीं ज्या बैठकीवर ब्राह्मण बसला असेल त्याच बैठकीवर शूद्रानें बसणें हा शूद्राचा मोठा अपराध समजत असत. परंतु प्रस्तुत काळीं ज्या बैठकीवर शूद्र मोठ्या मानाच्या उंच आसनावर बसतो तिजवरच ब्राह्मण लोक हलक्या चाकरांप्रमाणें खुशाल बसतात*.

* ही चाल शास्त्रविरुद्ध आहे. हल्लीं अज्ञान जे ब्राह्मण व शूद्र तेच अशी गोष्ट करतात असें नाहीं; तर जे ज्ञाते ह्मणून गणले जातात तेही याच चालीप्रमाणें वागतात व त्यांच्या मनांत तिळप्रायही खंती वाटत नाहीं.

मनूनें असें ह्मटलें आहे कीं—

**सहासनमभिप्रेप्सुरुत्कृष्टस्यापकृष्टजः ।**
**कट्यांकृतांको निर्वास्यः स्फिचं वास्यावकर्तयेत् ॥ ८.२८१.**

"ब्राह्मण ज्या आसनावर बसला असेल त्या आसनावर शूद्र बसल्यास त्याच्या कुल्यांवर तापलेल्या लोखंडानें डाग देऊन त्यास हद्दपार करावें अथवा त्याचे कुळे कापून टाकावे."

अगदीं आलीकडच्या काळांत देखील आमच्या अनेक चालींत फरक पडलेला आहे. बंगाल्यांत वैद्यजातींतल्या लोकांनीं राजा राजवल्लभ याच्या वेळेपासून आलीकडे, अशौचकालाची मर्यादा पूर्वींपेक्षां कमीकरून ती पंधरा दिवसांची केली आहे व जानवीं घालण्याची नवी चाल पाडली आहे. त्याच्या वेळेच्या पूर्वीं त्या लोकांत अशौचकालाची मर्यादा एक महिन्याची होती व जानवीं घालण्याची चाल नव्हती. आणि या प्राचीन चालींप्रमाणें चालणारीं घराणीं वैद्यांमध्यें अजूनही आहेत. तर आतां या नव्या चाली घालणारे व त्यांचे वंशज यांस निंद्य मानून कोणीं जातिबहिष्कृत केलें आहे काय? दुसरें असें कीं, दत्तक चंद्रिका ग्रंथ प्रसिद्ध होण्यापूर्वीं सर्व हिंदू लोकांत दत्तक पुत्र घेणें तो, यथाशास्त्र दत्तविधान व्हावें ह्मणून, पांचवर्षांच्या आंतल्या वयाचा घेऊन घेणारास त्याचें चूडाकरण करावें लागत असे. तो ग्रंथ प्रसिद्ध झाल्यापासून आलीकडे ब्राह्मण जातींत मुंजीच्या अगोदर आणि शूद्रजातींत लग्नाच्या वयाच्या अगोदर मुलगा दत्तक घेतला असतां त्याचें दत्तविधान योग्य वयांतच होऊन यथाशास्त्र झालें असें मानितात.

हिंदुस्थानच्या या भागांत जिनगर लोक जानवीं घालूं लागले ही चाल अगदीं आलीकडची आहे हें सर्व हल्लींच्या वृद्ध लोकांच्या ऐकण्यांत आहे. कांहीं वर्षांमागें जिनगरांस लोकांत चांभाराप्रमाणें मानीत असत (त्यांच्या नावा-

च्या अर्थावरूनही हें सयुक्तिक दिसतें ) यास्तव त्यांस कुणवी लोकांच्या हौदांवर अथवा पाणवठ्यावर पाणी भरण्यासही लोकांत हरकत असे. न्हावी लोक त्यांच्या हजामती करीत नसत. परंतु अलीकडे त्या गोष्टी प्रचारांत अगदीं बंद होऊन जिनगर लोक कुणब्याच्या हौदावर पाणी खुशाल भरूं लागले व न्हावी त्यांच्या हजामती करूं लागले इतकेंच नाहीं; तर जिनगर लोक आपण जानवीं घालणारे वरिष्ठ जातीचे लोक आहों व कुणवी हे आपणांपेक्षां कनिष्ठ जातीचे आहेत, असें मानून त्या कुणब्यांच्या हौदांवर पाणी भरण्यास कांहींसे नाखुषही झाले आहेत. सुमारें तीन वर्षांपूर्वी सातारा शहरांत जिनगर लोकांनीं, आह्मास ब्राह्मणांच्या हौदांवर पाणी भरण्यास परमाणगी द्यावी असा अर्ज केला होता; परंतु तो अमान्य झाला. असो, याप्रमाणें जिनगर लोकांचा वरिष्ठ जातींत येण्याचा प्रयत्न अगदीं नवीन असून लोकांस तो बराच मान्य झाला आहे हें दिसतच आहे.

आजपावेतों ब्राह्मणजातीखेरीज इतर जातीच्या लोकांस संस्कृत भाषा शिकवण्याची चाल धर्मविरुद्ध अशी मानिली असल्यावरून मुळींच प्रचारांत नव्हती. परंतु अलीकडच्या दहा वर्षांत सरकारच्या मोठाल्या विद्यालयांतून जुने विद्वान शास्त्री लोक ठेवून पाहिजे त्या जातीस संस्कृत शिकविण्याची नवी चाल पडली आहे. ही भाषा दुसऱ्या जातींस शिकवण्याविषयीं,

**नोच्चरेत्संस्कृतांगिरां ।**

"(शूद्रापुढें) संस्कृत भाषेचा शब्द बोलूं नये."
ह्या वचनानें निषेध केला आहे असें मानीत असत. परंतु तो निषेध आतां अगदीं रद्द करून इतर जातींस संस्कृत भाषा जुने शास्त्री लोक बेलाशक शिकवितात. बरें, ते शिकवणारे धर्मविरुद्ध काम करण्याबद्दल लोकांत जातिबहिष्कृत असतील असें ह्मणावें तर तोही प्रकार तादृश कोठें दिसत नाहीं. तेव्हां ही चाल धर्म संबंधाची असून अगदीं नवी आहे किंवा नाहीं?

या प्रमाणेंच सुमारें शंभरवर्षांपूर्वी ब्राह्मण लोकांमध्यें यवनी भाषा शिकण्याची चाल अगदीं नव्हती असें ह्मटलें तरी चिंता नाहीं. आणि ती शिकण्याविषयीं,

**नवदेद्यावनीं भाषां प्राणैः कंठगतैरपि ।**

"कंठीं प्राण आले तरीं ( ह्मणजे पंचप्राणांवर संकट येऊन गुदरलें तरी ) म्लेंछ भाषेचा शब्द तोंडांतून काढूं नये."
असा निषेध आहे असें सर्व ह्मणत असत. परंतु तो निषेध आतां कोणाच्या स्वप्नांत तरी राहिला आहे काय ? दिवसानुदिवस म्लेंछभाषा (इंग्रेजी भाषा ही म्लेंछभाषाच आहे ) शिकण्याचा क्रम भूमिति प्रमाणानें वाढत आहे हें आबालवृद्धांच्या लक्षांत आहेच. तेव्हां ही चाल नवी आहे किंवा नाहीं?

याप्रमाणेंच या देशांत स्त्रीशिक्षणाविषयीं ही धर्मशास्त्रदृष्ट्या निषेध आहे असें किती एक अल्पविचारी मनुष्यांचें मत कांहीं दिवसांपूर्वीं प्रबल होतें; परंतु ईश्वरकृपेंकरून तें फार त्वरित क्षीण होत असून उत्तम वर्णांच्या मुलींच्या झुंडी सर्व ठिकाणच्या स्त्रीशाळांमध्यें येऊन भरूं लागल्या आहेत. आणि स्त्रियांच्या लग्नाच्या काळामध्यें "ब्राह्मणकन्याविवाहविचार" कर्त्याच्या सूचने प्रमाणें थोडासा फेरफार झाला ह्मणजे मोठाल्या शाळांचीं कामें स्वतंत्र रीतीनें चालविण्यासारख्या विद्वान व कुशल अशा स्त्रिया लवकरच तयार होतील यांत संशय नाहीं. ही स्त्रियांस शिकवण्याची चाल अगदीं नवी नव्हे काय?

या नव्या चालींपैकीं लोकांनीं कांहीं स्वेच्छेनें व हौसेनें काढल्या आहेत आणि कांहीं मूळच्या वचनांच्या नवीन व्याख्या करून तदनुसार पाडल्या आहेत. यांजवांचून सर्व लोकांचें ह्मणजे कांहीं आडलें होतें किंवा त्यांस मोठी एखादी नड येऊन पडली होती असें तर मुळींच नाहीं. तर कांहीं थोड्याशा लोकांस त्यांजपासून सोय झाली किंवा त्यांच्या समजुतींप्रमाणें त्यांस त्या बऱ्या वाटल्या. कारण, वरील वैद्यांनीं आपला अशौचकाळ कमी केला नसता, किंवा त्यांनीं जानवीं घातलीं नसतीं, किंवा पांच वर्षांहून अधिक वयाचे मुलगे दत्तक घेतले नसते

तर सर्व लोकांचा त्या गोष्टींपासून कांहीं फायदा झाला नसता व नुकसान ही झालें नसतें. या प्रमाणेंच जिनगर लोकांचीं जानवीं वगैरेच्या गोष्टी आहेत. परंतु विधवाविवाहाची चाल चालू नसल्या पासून हा सर्व देश किती जबर्दस्त दुखें व अडचणी भोगीत आहे! ही चाल नसल्यामुळें खरोखर इतकें दुःख होत आहे कीं, त्याची वास्तविक कल्पना देखील करतां येत नाहीं. आतां पाहा, फक्त थोड्याशा सोयींकरतां जर नवीन चालींचा आदर आपण करितों तर विधवांच्या विवाहाविषयीं आपलें शास्त्र आपणास वास्तविक रीत्या अनुकूल असल्यावर त्यांच्या भयंकर दुःखांच्या परिहाराकरितां आपण कोणत्या पाहिजे त्या नवीन चालींचा आदर निःशंकपणें मोठया आनंदानें करावा.

परंतु ही गोष्ट अत्यंत दुःखास्पद आहे कीं, आपणांपैकीं कितीएक लोक विधवाविवाहाच्या बाबतींत, "चाल" किंवा "रूढि" हा शब्दच कानीं पडला कीं तिजमध्यें कांहीं फेरफार करण्याचा विचार करणें, हेंच पातकाचें काम आहे असें मानतात. कितीएक लोकांच्या अंतःकरणांत विधवाविवाहाची चाल सुरू व्हावी असें आहे; परंतु ती सुरू करावी असें शब्द तोंडांतून बाहेर काढण्याची छातीच त्यांस नाहीं. कारण, तो विवाह देश चालीच्या विरुद्ध आहे. अरेरे! केवढी दुःखाची गोष्ट ही! चाल ही कर्तुं अकर्तुं अन्यथा कर्तुं समर्थ अशी एक महाराणीच होऊन बसली आहे! चाल हाच आमचा प्रमुख गुरु

झाला आहे. चाल हिचा अधिकार सर्व अधिकारांत वरि-ष्ठ मानला आहे. चाल हिनें जी अज्ञा केली ती शिर-सावंद्य झाली आहे.

हे चालो, तूं एक मोठी कुलस्वामिनी देवीच होऊन ब-सली आहेस! तुझा अंमल इतका जलाल आहे कीं, त्याविषयीं बोलण्याची सोयच नाहीं! तुझ्या भक्तांवर तुझी सत्ता किती अतोनात चालते ! तूं शास्त्रें तर अगदीं पादाक्रांत करून टाकलीं; सद्गुण समूळ पालथा घातला, खरें कोणतें खोटें कोणतें, बरें कोणतें वाईट कोणतें, हें जाणणाऱ्या शक्तीच्या मु-सक्या बांधून ती रसातळीं नेऊन टाकली. तुझ्या अमलाची सद्दी अशी कांहीं चमत्कारिक आहे कीं, ज्या गोष्टी सर्व-था शास्त्रविरुद्ध आहेत त्या तुझे भक्त अत्यंत मान्य करिता-त, व ज्या शास्त्रांस अनुसरून आहेत त्यांचा ते प्रसिद्धपणें तिरस्कार करितात.

ज्या लोकांस धर्म ह्मणजे काय, आणि अधर्म ह्मणजे काय, या गोष्टीचें तिलप्राय ज्ञान नाहीं व ज्यांस आपल्या बऱ्या वाईट आचरणा बद्दल बालाग्र काळजी नाहीं, असे लोक फक्त तुझ्या अद्भुत सामर्थ्या मुळें, जगांत धर्मिष्ट व सद्गुणी असे मानले जाऊन मोठा सन्मान पावतात. का-रण, ते तुझे ( चालीचे ) पूर्ण गुलाम आहेत आणि जे वास्तविकच धार्मिष्ठ व सद्गुणी आहेत व ज्यांचें आचरण अगदीं निष्कलंक आहे अशांनीं ही जर तुझी कांहीं अव-ज्ञा केली तर त्यांस भ्रष्ट, नीच, अविचारी, नास्तिक असे लोक मानतात.

आमच्या धर्मशास्त्रावर तरी काय हें अरिष्ट आलें आहे! त्याची खरी आज्ञा कोणी मानीत नाहीं. ज्या आचरणांच्या योगानें मनुष्य धर्मभ्रष्ट व केवळ पतित होतो असें प्रत्यक्ष शास्त्रांत वारंवार सांगितलें आहे तशा आचरणांत जे लोक जन्माचे जन्म घालवितात ते धर्मिष्ठ, आचारसंपन्न ह्मणून मानले जातात. वस्तुतः शास्त्रांत काय आहे आणि काय नाहीं याचा विचार बिलकूल न करितां केवळ लौकिक चालींवर लक्ष देऊन त्यांज प्रमाणें जपून चालणें हा महान दुराचार आहे. आणि पूर्वी एकेकाळीं सदाचार संपन्न जो हा आमचा प्रिय देश तोच आज आमच्या प्रबल दुर्भाग्यामुळें याच दुराचारानें ओतप्रोत भरून गेला आहे!

हरहर! हिंदुस्थानच्या स्त्रियांस प्रस्तुतचे दिवस काय दुःखाचे आले आहेत! याच भूमींतील लोकांचा आचार विचारा विषयीं सर्व देशांत मोठा डंका गाजत होताना? आणि आतां तीच भूमि कितीएक दुराचारांनीं अगदीं भरून गेली आहे असें तेच देश मानतात, हें पाहून अंतःकरण अगदीं फुटून जातें. या देशाच्या हल्लींच्या निकृष्ट दशेवरून आणि लोकांच्या अविचाराच्या व दुराग्रहाच्या आचरणावरून पाहतां याची सुधारणा त्वरित होईल असें लक्षण दिसत नाहीं.

अहो बांधवहो! अहो मित्र हो! तुह्मी आतां या भ्रांतीमध्यें कोठवर राहणार! एकवेळ नेत्र उघडा, आणि सदाचरण व पातिव्रत्य या सद्गुणांचें अधिष्ठान ह्मणून प्रसिद्ध जें तुमचें आवडतें हिंदुस्थान त्यांत व्यभिचार, भ्रूणहत्या, बाल-

हत्या इत्यादि दुराचरणांच्या नद्यांचे मोठाले प्रवाहच वाहत आहेत ते पहा. याप्रकरणीं तुमच्या निकृष्टावस्थेची सीमाच होऊन गेली आहे. मी तुह्मास भलतें सलतें कांहीं करण्यास सांगत नाहीं. तुह्मी फक्त आपल्या शास्त्रावर लक्ष देऊन त्यांतील मर्म उमजा, ह्मणजे तुमच्या या नामांकित देशाच्या तोंडास लागलेला कलंक तुह्मास घालवतां येईल. परंतु अरेरे, अंधपरंपरेनें चालत आलेल्या वेड्या चालींचा दुष्ट अंमल तुह्मावर फार जारी आहे. केवळ लोकांतले रिवाज व रीति भाती यांचे तुह्मी अगदीं दासच बनून राहिला आहां, यावरून तुह्मी सन्मार्गास लवकर लागाल कीं नाहीं आणि तुमची गमावलेली अब्रू तुह्मी पुनः लवकर मिळवाल कीं नाहीं असा मोठा संशय वाटतो आणि अंतःकरणास अतिशय खिन्नता उत्पन्न होते. अनाथ विधवांस दुःख सागरांत लोटून त्यांचे हाल पाहण्याचा अभ्यास तुह्मास रात्रंदिवस पडल्यामुळें तुमची कुशाग्रबुद्धि आणि दयादिक उत्तम मनोविकार यांस इतकें मांद्य आलें आहे कीं, त्या बिचाऱ्यांच्या दुःखाविषयीं तुमच्या मनांत विचार उपजणें ह्मणजे बहुतेक असंभाव्यच झालें आहे. त्या बिचाऱ्यांच्या पाठीवर मदनाच्या चाबकांचा सपाटा उडतो तेव्हां त्या सहजच आपल्या ब्रह्मचर्याचा भंग करून मदनानें दाखवलेला मार्ग धरतात आणि तुह्मी ही त्यांच्या त्या आचरणाविषयीं अगदीं डोळेझांक करितां आणि मग तुमच्या मनांतून तुमची नीति व तुमचा धर्म हे नष्ट होऊन केवळ लोकांत बभ्रा नव्हावा ह्मणून तुह्मी त्यांच्या गर्भपाताच्या

अथवा बालहत्येच्या कामांत पुढारी होऊन सक्त मेहनत करितां. बरें, तुह्मी विचार करा कीं, आपल्या शास्त्राच्या आज्ञांप्रमाणें चालून त्यांचीं पुनः लग्नें करावीं, त्यांस असह्य दुःखांतून बाहेर काढावें आणि स्वतः आपणास ही अनेक प्रकारच्या दुःखांपासून व पातकांपासून दूर राखावें हें करण्यास तुह्मी इतके नाखुष आहां तेव्हां केवढें हें महदाश्चर्य !! तुह्मास कदाचित असें वाटत असेल कीं, मनुष्यस्वभावास धरून असणारे जे कामादि विकार ते पतींच्या मरणा बरोबरच स्त्रियांच्या मनापासून नाहींसे होतात; पण असें असलें तर प्रत्यहीं तुमच्या दृष्टी पुढें जीं असंख्य उलट उदाहरणें घडत आहेत त्यांवरून ही तुमची चूक आहे असें तुह्मास सहज समजावें. अरेरे ! कल्पवृक्षासमीप बसून, फक्त डोळे उघडून विचार न केल्यामुळें त्याचीं अमृतमय फळें न तोडतां धडधडीत विषवृक्षाचीं फळें तोडतां, तेव्हां तुह्मास आतां काय ह्मणावें, आणि या तुमच्या अविचाराबद्दल खेद तरी किती करावा! ज्या ठिकाणीं पुरुषांस तिळमात्र दया नाहीं व करुणा नाहीं, ज्या ठिकाणीं खरें खोटें व बरें वाईट हें त्यांस कांहीं समजत नाहीं, ज्या ठिकाणीं लोकांतल्या चाली व रीतिभाती ह्या राखणें हेंच काय तें आपलें उत्कृष्ट कर्त्तव्य कर्म, हाच आपला परम धर्म, व हीच आपली सुनीति, असें पुरुष समजतात त्या ठिकाणीं स्त्रिया जन्मासच न याव्या हें फारच उत्तम. पण हें कसें होईल.

हे अबले, अनाथ स्त्रिये, हिंदुस्थानांत तुझ्या दुःखास बिलकूल पारावारच नाहीं!

---

## परिशिष्ट.

ऋग्वेदसंहितेच्या सातव्या अष्टकाच्या आठव्या अध्यायाच्या अठराव्या वर्गांत खालीं लिहिलेला मंत्र आहे त्यावरून विधवा द्वितीय वर करीत असत असें स्पष्ट सिद्ध होतें. तो मंत्र असाः—

**कुहस्विद्दोषा कुहवस्तोरश्विना कुहाभिपित्वं करतः कुहोषतुः ॥ कोवां शयुत्रा विधवेव देवरं मर्यंन योषा कृणुते सधस्थआ ॥**

या मंत्रावरील निरुक्त.

क्वस्विद्रात्रौ भवथः क्वदिवा क्वाभिप्राप्तिं कुरुथः क्व वसथः कोवां शयने विधवेव देवरं। देवरः कस्मा द्वितीयोवर उच्यते। विधवा विधातृकाभवति विधवनाद्वा विधावनाद्वेति चर्मशिरा अपिवा धवइति मनुष्यनाम तद्वियोद्विधवा। देवरो दीव्यातिकर्मा। मर्यो मनुष्यो मरण धर्मा। योषा यौतेराकुरुते सहस्थाने॥ अथ निपाताः पुरस्तादेव व्याख्याताः। यथो ति कर्मोपमा ॥

या मंत्रावरील सायनाचार्याचें भाष्य.

अथ द्वितीया—कुहस्विदिति हे आश्विना आश्विनौ कुहस्वित् क्व दोषा रात्रौ भवथ इतिशेषः। कुहवस्तोः क्वा दिवभवथः कुह क्वा अभिपित्वं अभिप्राप्तिं करतः कुरुथः कुह क्वा ऊषतुः वसथः किंच वां युवां कोयजमानः सधस्थे सहा स्थाने वैद्याख्ये आकृणुते परिचरणार्थं आत्माभिमुखीकरोति तत्र दृष्टांतौ दर्शयति। शयुत्रा शयने विधवेव यथा मृतभर्तका. नारी देवरं भर्तृभ्रातरं अभिमुखी करोति मर्यं न यथाच सर्वं मनुष्यं योषा सर्वा नारी संभोगकाले अभिमुखी करोति तद्व दित्यर्थः ॥

या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, अश्विनीकुमारांचा कोणएिक भक्त त्यांची प्रार्थना करीत असतां ते लवकर आले नाहींत, असें पाहून त्यांस ह्मणतो, अहो अश्विनीकुमारहो, तुह्मीं रात्रौ कोठें असतां? दिवसास कोठें असतां? कोठें अभीष्टप्राप्ति करून घेतां? कोठें वास करतां? आपल्या शय्येवर विधवा स्त्री आपल्या दुसऱ्या वराला किंवा साधारण कोणतीही स्त्री आपल्या पतीला संभोगकालीं आपणाशीं सम्मुख करून घेते, तसा कोणता यागकर्त्ता पुरुष तुह्माला आपणाशीं सम्मुख करून घेत आहे?

या भावार्था वरून सिद्ध होतें कीं, वेदांत विधवेस द्वितीय वर होणें ही गोष्ट अगदीं साधारण होती. या ठिकाणीं कोणता यागकर्ता पुरुष तुह्माला आपणाशीं सम्मुख करूनघेत आहे हा दार्ष्टांत आहे, आणि विधवा स्त्री दुसऱ्या वरास संभोगकालीं जशी आपणाशीं सम्मुख करून घेते, आणि साधारण कोणती ही स्त्री आपल्या पतीस संभोगकालीं जशी आपणाशीं सम्मुख करून घेते हे दोन दृष्टांत आहेत. दृष्टांत देण्याचा मुख्य हेतु असा असतो कीं, त्याच्या योगानें दार्ष्टांतांतील विषय स्पष्ट व्हावा. यावरून अर्थात असें दिसतें कीं, दृष्टांत जो देणें आहे तो सर्वांस सामान्यतः समजण्यासारखा अगदीं प्रसिद्धच असा असला पाहिजे. तेव्हां विधवेस द्वितीय वर असणें ही गोष्ट प्रसिद्धच असल्यावरून ती येथें दृष्टांतार्थ घेतली आहे.

या मंत्राच्या व्याख्येंत यास्कानें देवर शब्दाचा अर्थ

द्वितीय वर असा केला आहे व सायनाचार्यानें त्याचा अर्थ नवऱ्याचा भाऊ ह्मणजे दीर असा केला आहे. त्या दोघांमध्यें यास्क हा फार प्राचीन आहे व सायनाचार्य अगदीं अर्वाचीन आहे. तेव्हां पहिल्याच्या मताप्रमाणें विधवेचा पुनर्विवाह व दुसऱ्याच्या मताप्रमाणें विधवेचा नियोग हे पूर्वीं अगदीं साधारण प्रचारांत होते असें वेदावरून सिद्ध होतें.

श्राद्धकर्मामध्यें जे ब्राह्मण सांगावयाचे त्यांत अमुक प्रकारचे ब्राह्मण सांगूं नयेत असा कांहीं नियम, हेमाद्रि व पृथ्वीचंद्रोदय या ग्रंथांत, भारतांत दानधर्मप्रकरणांत, चंद्रिका व श्राद्धकाशिका या ग्रंथांत वगैरे ठिकाणीं सांगितला आहे. कमलाकरभट्टानें निर्णयसिंधूंत श्राद्ध प्रकरणाच्या प्रसंगीं याबद्दल स्वतांचे श्लोक करून घातले आहेत आणि त्यांज विषयीं आधार हेमाद्रि व पृथ्वीचंद्रोदय या ग्रंथांचा दिला आहे. ते श्लोक येणें प्रमाणें:—

अत्र मामकाःश्लोकाः **वर्ज्यानूप्रब्रक्ष्येत्वथरोगिवैरिहीनाधिकांगान्कितवान्कृतघ्नान्। नक्षत्रशास्त्रेणचजीवमानान्भेषज्यवृत्त्यापिचराजभृत्यान्॥ संगीतकायस्थकुलादिवृत्त्यावेदत्रयेणापिकविवत्वभृत्या। देवार्चनेनापिचजीवमानान्स्वाध्यायदाराग्निसुतोज्झकाणान्॥ दुर्वालिखल्वाटकुनख्यधार्मिनटांश्चयौनभैवकुण्ठदंतान्। अगारदाहीगरदःसमुद्रयायीचकुंडाद्यथकूटकारी॥ बालांश्चयोध्यापयतेस्वपुत्रादवाप्तविद्यस्त्वथकुंडगोलौ। अग्रेदिधिष्वाःपतिरस्त्रकर्त्तासोमक्र-**

यीतैलिककैकराक्षी ॥ युद्धाचार्यःपक्षिणांपोषकश्चस्त्रोतो-
भेत्तावृक्षसंरोपकश्च । मेषाणांवामाहिषाणांचपुष्टयास्त्री-
यस्त्रीषुप्राहितैर्यश्चजारैः ॥ जीवत्यध्येतुश्चदत्तानुयोगाद्द्रव्य
प्राप्त्यैवेदमुद्धाटयंतः । ग्रामयाजिपशुकेशविक्रयीस्तेनशि-
ल्पिपितृवादकारकान् । अर्थकामरतशूद्रयाजकश्वभ्रुहीि-
नजटिमुंडिनिर्घृणान् ॥ यस्यचैवगृहिणीरजस्वलास्वार्थपा-
रकतशापदायकान् । क्लीबकुष्ठयतिविलोहितेक्षणान्कुब्ज-
वामनमृषाभिशापिनः ॥ पुत्रहीनमथकूटसाक्षिणंप्रातिहा-
रिकमयाज्ययाजकम् । स्वात्मदातृपरिवेतृनाग्रकस्तेनहिंस्त्र-
कमुखान्विवर्जयेत् ॥ अत्रमूलंहेमाद्रौपृथ्वीचंद्रोदये वज्ञेयं* ॥

"रोगी, वैरी, कमी अथवा अधिक अवयवाचा, फाशांनीं खेळणारा, कृतघ्न, ज्योतिषी, वैद्य, राजाचा नोकर, गायक, किंवा वादक, कारकून, सराफ, कवितेवर उपजीविका करणा• रा वेदांवर उपजीविका करणारा, देवपूजेनें उपजीविका करणारा, वेदाध्ययन टाकणारा, बायको अग्नि किंवा पुत्र यांस टाकणारा, काणा, वाईट केसांचा, टकल पडलेला, वाईट नखांचा, अधर्मी, नट, पौनर्भव (विधवेनें द्वितीय विवाह केल्या नंतर तिच्या उदरीं झालेला), काळ्या दांतांचा, घरास आग लावणारा, विष देणारा, समुद्रयात्रा करणारा, कुंडण्या, खोटें काम करणारा, मुलांस पढविणारा, आपल्या पुत्राचा विद्यार्थी, पति जिवंत असतां किंवा त्याच्या मागें जारा-पासून झालेला, जिचें दुसरें लग्न झालें आहे अशा स्त्रीचा

* निर्णय सिंधु, तृतीय परिच्छेद.

पति, शस्त्रें करणारा, सोमरस किंवा तेल विकाणारा, वांकड्या दृष्टीचा, युद्धांतला मुख्य, पोपट वगैरे पक्षी पाळणारा, पाण्याचा ओघ मोडणारा, झाडें लावणारा, बकरे किंवा रेडे पाळून जीवन करणारा, स्वस्त्रीस जार आणून देऊन उपजीवन करणारा, विद्यार्थ्यांपासून द्रव्य घेऊन जीवन करणारा, द्रव्यप्राप्तीकरतां वेद सांगणारा, ग्रामोपाध्याय, लोंकर विकणारा, चोर, शिल्प काम करणारा, मातापितरांशीं भांडणारा, द्रव्यप्राप्तीविषयीं तत्पर, शूद्राचें होम हवन करणारा, मिशा नसलेला, जटिली, मुंडन केलेला, निर्दय, बायको रजस्वला असलेला, केवळ आपणाकरतांच पाक करणारा, शाप देणारा, नपुंसक, कुष्ठी, आरक्त नेत्रांचा, वांकड्या अंगाचा, ठेंगणा, व्यर्थ शिव्यागाळी देणारा, अपुत्रिक, खोटा साक्षी, पाहरेकरी, ज्याचें होम हवन निषिद्ध आहे त्याचें तें करणारा, आपणास दासवत् देणारा, ज्येष्ठ बंधूच्या अगोदर विवाह करून घेणारा, जाग्रणानें जीवन करणारा, चोर, आणि भयंकर मुखाचा इतके ब्राह्मण श्राद्धांत वर्ज्य करावे."

या वर्ज्यांत मात्र पौनर्भव (पुनर्विवाहित विधवेपासून झालेला) व अग्रेदिधिषूपति (पुनर्विवाहित विधवेचा पति) यांचा संग्रह केला आहे; ह्मणजे त्यांस श्राद्धांत क्षणास सांगूं नये असा निषेध केला आहे. परंतु भारत, चंद्रिका, श्राद्धकाशिका इत्यादि ग्रंथांतील उतारे कमलाकरभट्टानें निर्णयसिंधूंत त्याच प्रसंगीं केले आहेत, त्यांत वर लिहिले-

त्या त्याज्य ब्राह्मणांपैकीं बहुतेकांचें परिगणन असून पौन- र्भव व पुनर्भूपति यांचें नांव मुळींच घेतलें नाहीं. यावरून ते निषिद्धत्वें करून सर्व ग्रंथकर्त्यांस विवक्षित नव्हते व अर्थात त्यांच्यामतीं ते श्राद्धोपवेशनींही योग्य होते असें उघडपणें सिद्ध होतें. दुसरी गोष्ट अशी कीं, श्राद्धास सांगावयाचे ब्राह्म- ण अमुक लक्षणांचे असावे व अमुक लक्षणांचे नसावे या- विषयीं कांहीं ग्रंथकर्त्यांनीं इतका बारीक विचार केला आहे कीं, त्यांनीं सांगितलेल्या लक्षणांचा ब्राह्मण हजार पा- चशांमध्यें वेळेस एक देखील सांपडणें कठिण आहे असें असल्यामुळें त्यांचीं लक्षणें त्यांच्या ग्रंथांतच राहिलीं आहेत, लोकांच्या वहिवाटींत तादृश आलीं नाहींत. आणि या वर्ज्यग- णामध्यें ज्योतिषी, कवि, देवपूजक, अध्यापक वगैरे किती एक प्रशस्त मानलेले ही ब्राह्मण घातले आहेत, तेव्हां ज्या कर्मांत असले ब्राह्मण अयोग्य ह्मणून सांगिले त्यांतच पौनर्भव आणि पुनर्भूपति हे अयोग्य असें एकदोघां ग्रंथ कर्त्यांनीं सांगितलें. यावरून त्यांस गौणत्वतें कितपतसें येणार आहे हें ही दि- सतच आहे.

आतां ज्या कोणाच्या मतीं ते श्राद्धीं निषिद्ध होते त्यां- च्या मताप्रमाणें या गोष्टीबद्दल विचार करूं. सर्व शास्त्रांत असा एक साधारण नियम आहे कीं, विधीची प्राप्ति अस- ल्यावांचून त्याचा निषेध केलेला असतच नाहीं. आणि पौनर्भवाचा व पुनर्भूपतीचा श्राद्धोपवेशनीं निषेध सांगितला यावरून त्यांची त्या गोष्टीविषयीं प्राप्ति असलीच पाहिजे.

ती प्राप्ति, त्यांशीं अन्नादिव्यवहारच मुळीं वर्ज्य असता तर कधीं आलीच नसती, आणि या निषेधास सर्वथा वैय्यर्थ्यच आलें असतें. तेव्हां त्यांच्या ग्रंथाची संगति लावण्याकरितां पौनर्भव व पुनर्भूपति यांजबरोबर अन्नव्यवहार, शरीरसंबंध वगैरे सर्व गोष्टी प्रशस्त रीतीनें होत असत आणि क्षणाखेरीज अन्यकर्मांच्या प्रसंगीं त्यांस ब्राह्मण सांगण्यासही अगदीं हरकत नव्हती, असें त्यांच्याच मतीं साफ सिद्ध होतें.

या परिशिष्टांतील दोन्ही गोष्टींपासून ग्राह्य अंश इतकाच समजला पाहिजे कीं, पुनर्विवाह आणि नियोग हे पूर्वीं प्रचारांत फार होते, आणि पुनर्विवाहित विधवेचा पति व तिच्या पोटची संतति सर्व धर्मकर्मसंबंधी व्यवहारास योग्य होती. बाकी हल्लीं लोकांत पुनः नियोगाचा संप्रदाय सुरू करावा असा आशय ह्या लेखाचा मुळींच नाहीं. आणि पुनर्विवाहित विधवेच्या पोटच्या प्रजेस कलियुगांत पौनर्भव न ह्मणतां औरसच ह्मटलें पाहिजे, हें तर या ग्रंथाच्या आरंभींच स्पष्ट रीतीनें सिद्ध केलें आहे.

समाप्त.